


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

वर्ष २७ वें, अंक १११ ] [ ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर

# १११

## अ नु क्र म णि का

# सामार-स्वीकार

१ वे. गोपाळदीक्षित गोखले यांचा अल्प परिचयः—(चरित्र) ले. प्रका. प. वि. गोखले १० अ, सदाशिव, टिळक रस्ता पुणें २

२ परक्याचे धनः— (नाटक) ले. गो. के. भट, प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, १९६।१९ टिळक रोड, पुणें २. मूल्य १॥ रु.

३ वावुरः— ले. वि. गं. लेले, प्रका. वि. वि. लेले, विश्वमंगल प्रकाशन ५२७ सदाशिव, पुणें २. मूल्य १॥ रु.

४ माझें वाङ्मयीन जीवनः— ले. काव्यविहारी, प्रका. स्कूल व कॉलेज बुकस्टॉल कोल्हापूर, मूल्य २॥ रु.

५ हत्याः— ( कादंबरी ) ले. श्री. ना. पेंडसे, प्रकाशन मौज प्रकाशन ब्यूरो लि., खटाववाडी मुंबई ४, मूल्य ५॥. रु.

६ नीहारः— ( कविता ) ले. पद्मा. प्रका. मौज प्रकाशन ब्यूरो लि. खटाववाडी, मुंबई ४, मूल्य २ रु.

७ पासंगः— ( टीकालेख संग्रह ) ले. कुसुमावती देशपांडे, प्रका. नागपूर प्रकाशन सीताबर्डी, नागपूर, मूल्य २॥। रु.

८ वटवृक्षः— ( एकांकिका ) ले. डॉ. कृष्णलाल श्रीधराणी, अनु. वा. कृ. चोरघडे, प्रका. नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर मूल्य ॥। रु.

९ पैंजणः—( कविता ) संपा—म. ना. अदवंत प्रका. चित्रशाळा प्रकाशन, १०२६ सदाशिव, पुणें २. मूल्य ४ रु.

१० कातखेळः— ( कथा ) ले. नलिनी शहा प्रका. सुरस ग्रंथमाला, सोलापूर मूल्य १॥।= रु.

११ एरिकः-(कादंबरी) ले. फ्रेडरिक विल्म फरार अनु. अंबादास तु. देवळे. प्रका. सुरस ग्रंथमाला सोलापूर मूल्य १॥= रु.

१२ शोधः— ( कथा ) ले. वसुंधरा पटवर्धन, प्रका. उदय साहित्य प्रकाशन, ९६ गंज, पुणें २ मूल्य २॥ रु.

१३ गृहदाहः— (कादंबरी) ले. शरच्चंद्र चटर्जी, अनु. भा. वि. वरेरकर, प्रका. अभिनव प्रकाशन, मुंबई १४ ( दोन भाग ) मूल्य प्रत्येकी २॥ व २ रु.

१४ हरिलक्ष्मीः—(कथा) ले. शरच्चंद्र चटर्जी, अनु. भा. वि. वरेरकर, अभिनव प्रका. मूल्य १ रु.

१५ बसव-दर्शनः— ले. जयदेवीताई लिगाडे, प्रका. प्रभुरावजी वकील, बीदर कन्नड कोटी प्रकाशन, सोलापूर, मूल्य १। रु.

१६ भावनांचें पाझरः— ( कथा ) ले. श्री. म. माटे, प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड पुणें २, मूल्य ३ रु.

नागपूर प्रकाशन, सीताबर्डी नागपूर, प्रकाशनें:—

१७ ( १ ) दैव विचार माला पुष्प १— रवि विचारः—ले. ह. ने. काटवे, मूल्य २ रु.

(२) दैव विचार माला, पुष्प २—चंद्रविचारः— ले. ह ने. काटवे, मूल्य २ रु.

(३) दैव विचार माला, पुष्प ३ —मंगळविचारः—ले. ह. ने. काटवे, मूल्य २॥ रु.

१८ आनंद कार्यालय, ३३० सदाशिव, पुणें २—बालवाङ्मय :

(१) गंमत जंमतः— ले. यशवंत जोशी मूल्य ८ आणे.

(२) दिव्यमणिः— ले. सविता आगरवाल, मूल्य ८ आणे.

(३) सोन्याचा बाणः— ले. ना. ध. पाटील, मूल्य १४ आणे.

(४) चंद्राराणीः—ले. गोपीनाथ तळवलकर, यशवंत जोशी, मूल्य ८ आणे.

---

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८।१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—वा. दा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २७ वें, अंक १११ ] [ ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर

## १११

## रस्त्याच्या कडेला

रस्त्याच्या कडेला
उभा उपेक्षित इमारतीचा
चिरेबंदी कोन !
कितीक वर्षे
उन्हांत भाजून पाण्यांत भिजून
थंडींत गोठून
आधीच टणक त्याचें सर्वांग
झालेलें आहे निबर ताठर !
कधी रस्त्यावर
कधी पायाशीं बिलगलेल्या
मऊ लवचीक हिरवळीवर
रोजची तीच ती गंमतजंमत
टवकारलेल्या कानांनी ऐकतो
किलकिल्या नेत्रीं सामावून घेतो !
कातर वेळीं
बाबागाडींतील चिमुकल्याच्या
बोबड्या बोलांत रांगूं लागणारें
निरागस हास्य !
दोन कातर वेड्या हृदयांची
लुसलुशीत मंद कुजबूज
मोठ्या कष्टाने काठी टेकीत
मागे पहात पुढे चाललेलें
म्हातारपण !
रावांची याटाची रंकांची कष्टाची
व्यर्थ धावपळ !
-आणि बोलतो स्वतःशीं कोन !
आज पाहतों मी काल जें पाहिलें
उद्या इथे कांही नसेल निराळें
तरीहि असेंच निश्चल राहून
तेंच तें पुन्हा पाहिलें पाहिजे
जरि कालातीत आणि दशातीत
आहेत माझे जीवनकण !
करूं काय, हाय.
आहे असहाय !

— माधव गोविंद काटकर

## हिरवी झाडी

हिरवी झाडी
वाट वाकडी
धडधड खडखड नाद घुमले जाई कुणाची गाडी ?
सफेत फेटा
डोई मोठा
चाबुक ओढुन बैल हकारी बंधु कुणाचा जेठा ?
बैल उधळले
चौखुर गेले
हृदयीं त्याच्या तसे प्रीतिचे भाव मनीं आले !
आठ दिसांवर
भाऊबीज तर
डोळे लावुन असेल बसली ताई माझी सुकुमार !
लांब टेकडी
पल्याड वाडी
वळसा घालुन खडखड धडधड क्षणांत गेली गाडी !
दिसूं लागला
पार तेथला
आनंदाश्रु आले खळकन् कां भाऊ गहिंवरला ?
ताई दिसली
गालीं हसली
'भाऊराया आले बाई' यजमानाला वदली

— सदाशिव माळी

---

## कळ

उमटावा पाठीवरी
आसुडाचा काळा वळ
मूक मनाची जखम
वाहावया भळभळ
झराव्यात उष्ण धारा
खोल डोळ्यांतुन जळ
आणि भास खोटा पडो
आटुनीया मृगजळ
आता नको काळवेळ
व्हावी सदा तळमळ
कण्हतांना आकळावी
वेदनेची दुष्ट कळ !

— राजा मंगळवेढेकर

---

अनुक्रमणिका






# हिंदी साहित्याचे इतिहास :

लेखक : विनयमोहन शर्मा
अनुवादक : भारती शर्मा

इतर भारतीय भाषांपेक्षा हिंदी भाषेचा कालखंड फार व्यापक आहे. त्यांत सुमारें एक हजार वर्षांपासून सतत साहित्य-निर्मिति होत आहे. तेंव पाहिल्यास राहुल सांकृत्यायन ह्यांनी विक्रम संवत् ६९० हा हिंदी साहित्याचा आदिकाल मानला असून सिद्ध सरहपाद* यांची हिंदीचे आद्य कवि म्हणून गणना केली आहे. त्यांच्या मतें सिद्ध कवींची काव्यधारा बाराव्या शतकापर्यंत अखंड वाहत होती. तींत स्वमताचा प्रचार जास्त असल्यामुळे हिंदी भाषेचें स्वरूप व विकास समजून घेण्यास बरीच मदत होऊं शकते. दुसरें असें की हें सिद्ध साहित्य बिहारी भाषेची उपभाषा ' मगही ' भाषेत आहे. मगही, भोजपुरी, मैथिली ह्या बिहारी भाषांना हिंदी भाषेच्या अंतर्गत मानावें किंवा नाही ह्याविषयी भाषाशास्त्रज्ञांचें एकमत नाही; पण मैथिल कवि विद्यापति मात्र हिंदीचे कवि मानले जातात. शिवाय हिंदी साहित्याच्या इतिहासांत त्यांचें गौरवपूर्ण स्थानहि आहे. बिहारीप्रमाणेच राजस्थानी भाषेत देखील साहित्य रचनेचा प्रघात फार प्राचीन आहे. हिंदीच्या ज्या प्रादेशिक भाषांत साहित्य मिळतें त्या भाषा म्हणजे राजस्थानी, व्रज, अवधी, मैथिली, मगही आणि खड़ी बोली ह्या होत. ( येथे आम्ही राजस्थानी आणि बिहारी ह्यांना हिंदीच्या अंतर्गत धरून चालतों. ) अशा रीतीने हिंदी साहित्य किती विविध रूपाने आणि निरनिराळ्या प्रदेशांतून आढळतें हें स्पष्ट दिसून येतें. ह्यावरून हिंदी साहित्याच्या आरंभीच्या इतिहासलेखकांना किती अडचणी आल्या असतील ह्याची कल्पना सहज येऊं शकते. ही खरोखरच आश्चर्याची गोष्ट आहे की हिंदी साहित्याचा पहिला इतिहास फ्रेंच भाषेत तासी नांवाच्या एका फ्रेंच विद्वानाने लिहिला. त्याचें नांव आहे "इस्त्वाद द ला लितेरात्यूर ऐं दुई ऐं ऐन्दुस्तानी". ह्यांत वर्णानुक्रमें सत्तर कवींचा परिचय दिलेला असून ग्रन्थाचे दोन भाग पाडले गेले आहेत. एका भागाचें प्रकाशन विक्रम संवत् १८९६ सालीं आणि दुसऱ्याचें प्रकाशन संवत् १९०३ सालीं झालें. ह्यांत कवि–तालिकेपेक्षा जास्त माहिती नाही. कवींच्या साहित्याचें त्यांत मूल्यांकन केलें गेलें नाही. ह्या फ्रेंच इतिहासाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं ह्याचे तीन भाग पाडण्यांत आले[1]. (श्री. वार्ष्णेय ह्यांनी याचें हिंदी रूपांतर देखील केलें आहे. ) ह्यांत कवींचें जीवन–वृत्त, त्यांच्या साहित्याबद्दल माहिती, आणि उदाहरणें हाच क्रम आढळतो.

सन १८७३ सालीं लखनऊ येथील नवलकिशोर प्रेसने "भाषा–काव्य–संग्रह" नांवाच ग्रंथ प्रकाशित केला. ह्याचे संपादक श्री. महेशदत्त शुक्ल होते. ह्यांत कांही कांही जुन्या कवींचा जीवन–परिचय आणि त्यांच्या लेखनाबद्दल माहिती दिली गेली आहे. ' ताँसी ' नंतर हिंदी कवींच्या गुणगौरवाचा हा दुसरा प्रयत्न आहे. सन १८९३ सालीं ठाकूर शिवसिंह

---

* सरहपाद ह्याच्या रचनेंत हिंदीचीं लक्षणें स्पष्ट आहेत:—

जहि मन पवन न संचरई रवि ससि नाहिं पवेस
तहि वढ चित्त विसाय करू सरहे कहिय उवेस ।

१ दुसरी आवृत्ति चार भागांतून प्रसिद्ध झाली आहे. ह्यांत अनेक नवीन प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध कवींची सोदाहरण यादी जोडली आहे.

सेंगर ह्यांनी सुमोरें एक हजार कवींच्या काव्याचा परिचयात्मक संग्रह तयार केला. हा संग्रह तयार करण्यांत सेंगर ह्यांनी बरेच श्रम घेतले ह्यांत शंका नाही.

सन १८८९ मध्ये सर ग्रिअर्सनने Modern vernacular literature of northern Hindustan नांवाचा कविवृत्तसंग्रह छापून प्रसिद्ध केला. ह्यांत ग्रिअर्सनने त्या काळापूर्वी होऊन गेलेल्या कविता-संग्रह करणाऱ्यांच्या श्रमाचा फायदा तर घेतलाच, शिवाय, कवींच्याविषयी थोडीबहुत टीका पण लिहिली.

गेल्या कांही दिवसांपर्यंत हिंदीच्या जुन्या हस्तलिखित ग्रंथांच्या शोधाचें कार्य सुरू करण्यांत आलें नव्हतें. काशी नागरी प्रचारिणी सभेने जेव्हा हें काम हातीं घेतलें तेव्हा सभेने आठ भागांच्या रूपाने आपली शोध-विवरण पुस्तकें छापलीं. त्यामुळे हिंदीचे अनेक अज्ञात कवि प्रकाशांत आले. सन १९१३ सालीं मिश्रबंधूंनी (गणेशविहारी मिश्र, श्यामबिहारी मिश्र व शुकदेवबिहारी मिश्र) 'मिश्रबंधु विनोद' (३ भाग) नांवाचा ग्रंथ प्रकाशित केला. त्यांत ३७६७ कवि आणि लेखकांविषयी माहिती देण्यांत आली होती. पण ह्या ग्रंथाला हिंदी वाङ्मयाचा इतिहास म्हणावें किंवा नाही, हा त्यांनाच प्रश्न पडला होता. त्यांनी प्रथम आवृत्तीच्या भूमिकेंत स्पष्ट लिहिलें आहे की, आधी आम्ही ह्या ग्रंथाचें नांव 'हिंदी साहित्याचा इतिहास' असें ठेवणार होतों. परंतु इतिहासाचें गांभीर्य लक्षांत घेऊन आमच्यांत साहित्य-इतिहास लिहिण्याची पात्रता नाही हें लक्षांत आलें. तसेच इतिहास ग्रंथांत लहानमोठ्या सगळ्याच कवींचा व लेखकांचा समावेश होऊं शकत नाही. त्यांत भाषा, वैशिष्ट्य आणि बदल ह्यांच्याकडे जितकें लक्ष दिलें जाईल तितकें कवींकडे नाही. पण आम्हीं तसें केलें नसून कवीकडे देखील पूर्ण लक्ष दिलें आहे. ह्या कारणाने ह्या ग्रंथांत केवळ साहित्येतिहासाशिवाय इतर माहिती पण दिली गेली आहे." मिश्रबंधूंनी पूर्व-कवि-कीर्तनकारांचा आणि नागरी प्रचारिणी सभेच्या शोध-प्रतिवेदनांचा ( Research Report ) पूर्ण उपयोग केला आहे. त्यांनी वाङ्मयरचनेची पुढीलप्रमाणे कालविभागणी केली आहे:—

( १ ) पूर्वारंभिक काल — वि. सं. ७००–१३४३ पर्यंत ( फार कमी साहित्य मिळतें. )

( २ ) उत्तरारंभिक काल — वि. सं. १३४४–१४४४ ( कमी साहित्य. )

( ३ ) पूर्व माध्यमिक काल — वि. सं. १४४५–१५६० ( कांही अधिक साहित्य मिळतें. )

( ४ ) प्रौढ माध्यमिक काल — वि. सं. १५६१–१६८० ( बऱ्याच प्रमाणांत )

( ५ ) पूर्वालंकृत काल — वि. सं. १६८१–१७९० ( फार चांगल्या प्रमाणांत )

( ६ ) उत्तरालंकृत काल — वि. सं. १७९१–१८८९ ( वर्धमान अवस्थेंत )

( ७ ) अज्ञातकाल.

( ८ ) परिवर्तन काल — वि. सं. १८९०–१९२५ ( विपुल प्रमाणांत. )

( ९ ) वर्तमानकाल — वि. सं. १९२६ आजपर्यंत ( अत्यंत वीपुल प्रमाणांत )

बहुतेक मिश्रबंधूंनी प्रथमतः स्थूलरूपाने हिंदी साहित्याची कालविभागणी केली. आदि प्रकरणांत ते कवि चंद, जल्हण आणि चार जैन कवींच्या कृतींचा उल्लेख करूं शकले. त्या वेळेपर्यंत आदिकालाविषयी शोध व्हावयाचा होता. पण अपभ्रंशमिश्रित कृतींचा आदिकालामध्ये समावेश करण्याइतका विचार त्यांना सुचला होता. अपभ्रंशापासून हिंदी भाषेचा कसा रीतिने विकास होत होता हें समजून घेण्याकरता जैन कवींच्या काव्याचीं उदाहरणें महत्त्वाचीं वाटतात.

आचार्य रामचंद्र शुक्ल ह्यांनी मिश्रबंधूंच्या "कवि–कीर्तनाची" ठिकठिकाणीं चेष्टा केली आहे. त्यांच्या इतिहासाला कवींची 'यादी' म्हटलें आहे. ह्यांत साहित्याची कालविभागणी लोकांच्या मानसिक स्थितीच्या ओघानें नसून केवळ अनेक कवींची यादी संकलित करण्याची विशेष प्रवृत्ति दिसून येते. तरी पण इतकें मात्र खरें की, हा ग्रंथ हिंदी कवींचा अगदी पहिला, मोठा आणि किंचित् विस्तृत असा इतिवृत्तात्मक ग्रंथ आहे. मिश्रबंधूंच्या ह्या इतिहासावर कडक टीका करूनहि रामचंद्र शुक्ल ह्यांनी त्यांतील बऱ्याच माहितीचा उपयोग केला आहे. 'विनोद' नंतर मिश्रबंधूंनी तुलसीदास, सूर, देव बिहारी, भूषण, मतिराम, केशव, कबीर, चंद्र आणि हरिश्चंद्र ह्यांच्याविषयी टीकात्मक निबंध लिहिले आणि ते सन १९१० सालीं 'नवरत्न' ग्रंथाच्या रूपानें प्रसिद्ध केले.

सन १९१७ सालीं पं. रामनरेश त्रिपाठी ह्यांनी लिहिलेले "कविता-कौमुदीचे" दोन भाग प्रकाशित झाले. त्यांत प्राचीन आणि अर्वाचीन कवींचे संक्षिप्त परिचय आणि त्या त्या कवींच्या काव्याचीं उदाहरणें देण्यांत आलीं. ह्यांत ऐतिहासिक तत्त्वांचा अभाव असूनहि इतिहासकरांना थोडीबहुत माहिती मात्र मिळते. सन १९१८ सालीं एडविन् गीव्जने इंग्रजींत "A Sketch of Hindi literature" नांवाचें पुस्तक लिहिलें आणि दोन वर्षांनंतर एफ. आय. के. ने लिहिलेलें "History of Hindi literature" हीं दोन्हींहि पुस्तकें इंग्रजींत हिंदी साहित्याचा केवळ परिचय करून देतात; 'इतिहास' लिहिण्याचा हेतू त्यांत आढळत नाही. सन १९२९ सालीं 'हिंदी–शब्द–सागर'च्या प्रस्तावनेच्या रूपानें पं. रामचंद्र शुक्ल ह्यांनी लिहिलेला "हिंदी साहित्याचा इतिहास" प्रकाशित झाला. अनेक दृष्टींनी हा इतिहास हिंदी साहित्याच्या इतिहासलेखनाचा व्यवस्थित प्रयत्न आहे. ह्यांत हिंदुस्थानच्या तत्कालीन सामाजिक, धार्मिक आणि राजनैतिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर साहित्याची दिशा आणि प्रगति निश्चित करण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे. आणि त्या त्या काळांतील युग–प्रवृत्तीच्या आधारें हिंदी साहित्याच्या सुमारें एक हजार वर्षांच्या काळाची त्यांनी पुढीलप्रमाणे विभागणी केली आहे:—

(१) आदिकाल — वीरगाथाकाल संवत् १०५० ते १३७५
(२) पूर्वमध्यकाल — भक्तिकाल ,, १३७५ ते १७००
(३) उत्तरमध्यकाल — रीतिकाल ,, १७०० ते १९००
(४) आधुनिककाल — गद्यकाल ,, १९०० ते आतापर्यंत.

विक्रम संवत् १०५० पूर्वी अपभ्रंश साहित्याची हिंदीला जी परंपरागत जोड मिळाली त्याकडे शुक्लजींनी फारसें लक्ष न देतां हें कार्य केलें. राहुल सांकृत्यायन आणि हजारीप्रसाद द्विवेदी ह्यांनी साहित्य म्हणजे मानव-विचारांची अविच्छिन्न परंपरा, ह्या दृष्टीने केवळ हिंदी साहित्याचाच नव्हे तर ज्या भाषेपासून त्याचा जन्म झाला आहे, त्याच्या साहित्याचा शोध घेणें आवश्यक मानलें आहे. अपभ्रंश साहित्याकडे शुक्लजींचें लक्ष गेलें नाही, अशांतला भाग नाही. पण त्यांत साहित्यिकतेपेक्षा त्यांना सांप्रदायिकता जास्त दिसून आली. आणि म्हणूनच संवत् १०५० च्या पूर्वीच्या साहित्याला त्यांनी विशेष महत्त्व दिलें नाही. गुलेरीजींनी अपभ्रंश मिश्रित साहित्याला 'जुनी हिंदी' च मानलें आहे.

वर म्हटल्याप्रमाणे कोणत्याहि भाषेचें साहित्य म्हणजे आपल्या मातृभाषेच्या साहित्याचा अखंड प्रवाह असतो. आणि म्हणूनच त्याची कालखंडांत विभागणी करणें खरोखरीच दुष्कर कार्य आहे. मनुष्याच्या स्वभावांत आणि प्रवृत्तीमध्ये सहसा बदल होत नाही. म्हणून

मानवी प्रवृत्तींच्याप्रमाणे काळाची निश्चित विभाजक-रेषा आखणें अशक्य आहे. शुक्लजींच्या इतिहासांतील कालविभागणी अध्ययनाच्या सोयीच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. आणि विभागणीच्या व्यावहारिकतेमुळे त्यांना आधुनिक काळाला गद्य आणि पद्य अशा दोन उपविभागांत वाटून पंचवीस-पंचवीस वर्षांच्या साहित्याचा अभ्यास करावा लागला. त्यांनी व्यक्तींच्या नांवावर काळाची विभागणी केली नाही. व्यक्ति आपल्या समकालीन युगाची निर्माती असते-आपल्या काळाची अधिष्ठात्री असते-आणि व्यक्तीच आपल्या प्रभावी व्यक्तित्वामुळे साहित्यांत गति विशेषाला चालना देते ह्या सत्याला त्यांनी मान्यता दिली नाही. त्यांच्या इतिहासांत लोकांच्या चित्तवृत्तींचा अभ्यास करण्याचा जिथे प्रयत्न आहे तिथे त्या चित्तवृत्ती प्रतिबिंबित करणाऱ्या जानपद साहित्याकडे त्यांनी मुळीच लक्ष्य दिलें नाही. हें "अलिखित-साहित्य" बहुधा लिखित साहित्याचें उगमस्थान असतें. पण आपल्या इतिहासांत त्यांनी ज्या मतांचें, वादांचें, तथ्यांचें आणि प्रवृत्तींचें विवेचन केलें आहे त्यांचा आजपर्यंत प्रभाव आहे. प्राचीन भारतीय संस्कृतिमूलक राष्ट्रीयता हा त्यांच्या इतिहास-लेखनाचा दृष्टिकोण होता. बहुजनाला मान्य असणाऱ्या 'लोक-मंगला'च्या तत्त्वाच्या कसोटीवर हिंदी कवींचें मूल्यांकन त्यांनी केलें. म्हणूनच परम्परापोषक 'तुलसी'-ला त्यांनी विशेष महत्त्व दिलें. कदाचित् छायावादी काव्यांत व्यक्तीच्या उच्छ्वासांचें प्राधान्य पाहून त्याच्याविषयी त्यांच्या मनांत सहानुभूति उत्पन्न झाली नसावी. खरें म्हटलें म्हणजे आपला 'आग्रह' मांडतांना त्यांना कधीच संकोच वाटला नाही. त्यांचा इतिहास नंतरच्या इतिहासकारांकरिता 'आदर्श' ठरला. त्याच्या आजपर्यंत कित्येक आवृत्त्या निघाल्या आहेत. नव्या आवृत्तींत आधुनिक काळांतील लेखकांची नामावलि वाढविण्यांत आली आहे. ती मात्र शुक्लजींच्या गंभीर विवेचक चित्तवृत्तीला धरून नाही.

शुक्लजींच्या इतिहासानंतरच डॉ. श्यामसुंदरदास ह्यांचें "हिंदी भाषा आणि साहित्य" हें पुस्तक प्रकाशित झालें. ह्यांत हिंदी भाषेचा विकास दाखवून साहित्यांतील विविध ओघ क्रमबद्ध करण्याचा प्रयत्न केला गेला आहे. शुक्लजीप्रमाणेच युगविशेषांच्या सामाजिक व धार्मिक पार्श्वभूमीवर साहित्याच्या प्रवृत्तींचा विचार केला आहे. व्यक्तींची नांवें आणि उदाहरणें फार कमी आहेत. विवेचनदेखील अपूर्ण आहे. पाटणा-विश्वविद्यालयांत पं. अयोध्यासिंह उपाध्याय ह्यांनी 'हिंदीभाषा आणि तिचा विकास' ह्या विषयावर भाषण केलें, त्यांत डॉ. श्यामसुंदर-दासांप्रमाणेच हिंदीभाषा आणि साहित्य यांचें सिंहावलोकन आहे.

सन १९३० साली डॉ. सूर्यकांत ह्यांनी "हिंदी साहित्याचा विवेचनात्मक इतिहास" लिहिला. त्यांत नवीन संशोधन फारच कमी आहे. आणी शिवाय विवेचनाची भाषा शास्त्रीय नसून काव्यात्मक अधिक आहे. ह्यानंतर एका वर्षाने डॉ. रसाल ह्यांनी एक मोठा इतिहास लिहिला, तो लाला रामनारायण यांनी प्रयागहून प्रकाशित केला. ह्यांत आधुनिक काळांतील कांही नवीन लेखकांचा समावेश केला आहे. सन १९३४ साली पं. कृष्णशंकर शुक्ल ह्यांनी "आधुनिक हिंदी साहित्याचा इतिहास" लिहिला. त्याच्या लोकप्रियतेचें प्रमाण म्हणजे ह्याच्या आठ आवृत्त्या निघाल्या. पण ह्यांत आधुनिकतम प्रवृत्तींचें विवेचन समाविष्ट केलेलें नाही. प्राचीन जीवित कवींनीदेखील 'शैली' आणि 'वस्तुचयन' करतांना आपल्या काळाच्या दृष्टीने नवीन दृष्टिकोण स्वीकारण्याचा प्रयत्न केला. म्हणून ह्या इतिहासांत पूर्ण संशोधन व परिवर्धन यांची आवश्यकता आहे. हिंदी साहित्याच्या इतिहासांत साहित्यिक कृतींच्या व्यतिरिक्त वैद्यक, रसायन, भूगोल इत्यादिसंबंधी शास्त्रीय साहित्याचा पण उल्लेख केला जातो. त्यामुळे असा प्रश्न उद्भवतो की भाषेंत लिहिल्या जाणाऱ्या सर्व कृतींचा साहित्याच्या इतिहासांत उल्लेख व

मूल्यांकन करणें योग्य आहे काय ? माझ्या मतें साहित्येतर शास्त्रीय कृतींच्या यादीला साहित्याच्या इतिहासांत कांही स्थान नसावें. कारण विज्ञान आणि साहित्य ह्यांचीं क्षेत्रें भिन्न आहेत.

सन १९२२ सालीं डॉ. रामकुमार वर्मा ह्यांनी ' हिंदी साहित्याचा आलोचनात्मक इतिहास ' लिहिला. ह्यांत चारण आणि भक्तिकालाची माहिती दिली आहे. ह्या इतिहास-विषयी मिश्रबन्धूंचें मत आहे की—"डॉ. रामकुमार वर्मा ह्यांनी संशोधनात्मक विषयाचा विशेष उपयोग केला आहे. त्यांनी केलेली काव्यसमीक्षा सुद्धा प्राचीन काळीं मान्य असलेल्या आदर्शा-प्रमाणे नाही. त्यांनी लेखकाची अंतर्दृष्टि आणि भावानुभूति ह्यांवर प्रकाश पाडला आहे. पण त्यांना स्वतःचा नवीन ऐतिहासिक दृष्टिकोणहि नाही आणि व्यापक व सुदृढ ऐतिहासिक पृष्ठ-भूमि पण नाही. ह्यामुळे त्यांनी केलेला कालविभाग अर्थहीन वाटतो. परंपरागत विचार-सरणीच्या विरुद्ध विद्रोहात्मक दृष्टि मांडणें त्यांना शक्य झालें नाही. ह्या कारणाने त्यांचा ग्रन्थ हिंदी साहित्याचा इतिहास नसून हिंदी साहित्यावर 'रिसर्च वर्क' म्हणून 'डॉक्टरेट' साठी लिहिलेला ' थीसिस ' वाटतो. ( ह्या ग्रन्थावरच लेखकाला नागपूर विश्वविद्यालयाने पी. एच्. डी. ची पदवी दिली आहे.)

डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी ह्यांनी लिहिलेल्या " हिंदी साहित्याची भूमिका " ह्या ग्रन्थांत हिंदीच्या आदिकालापासून तों रीतिकालापर्यंत राजनैतिक, सामाजिक आणि धार्मिक परि-स्थितीचें चांगलें विवेचन केलें आहे. सन १९४१ सालीं श्री. ब्रजरत्नदास ह्यांनी "खडी बोली हिंदी साहित्याचा इतिहास" लिहिला. ह्यांत हिंदी भाषेच्या खडी बोलीच्या साहित्याचा इतिहास प्रथमतः संकलित करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे.

सन १९४६ सालीं श्री. चतुरसेनशास्त्री ह्यांनी " हिंदी भाषा आणि साहित्याचा इतिहास प्रकाशित" केला. 'दोन शब्द' लिहितांना त्यांनी म्हटलें आहे की, "मीं आपल्या पूर्ववर्ती आणि समकालीन हिंदी साहित्यलेखकांमध्ये प्रचलित परंपरेचें उल्लंघन करून स्वतःचा नवीन ऐतिहासिक दृष्टिकोण मांडण्याचा प्रयत्न केला आहे... ह्या ग्रंथांत साहित्याला जास्तींत जास्त व्यापक रूप दिलें आहे. मी ललित साहित्याच्या नादीं लागलों नाहीं. भाषा आणि लिपी यांना मीं साहित्याचें वाहन मानतों. म्हणूनच त्यांचा पण थोडासा परिचय करून दिला आहे. " तथापि वादग्रस्त प्रश्न सोडविण्याच्या भानगडींत लेखक पडला नाहीं ! बहुमताचें अनुकरण केलें आहे. पहिल्या खण्डांत ' भाषा आणि लिपि-विज्ञान' याचा विचार केला आहे. हें प्रकरण भाषा-विज्ञानावर असलेल्या पुस्तकांच्या आधारावर लिहिलें आहे. डॉ. श्यामसुंदरदास ह्यांनी सुद्धा आपल्या इतिहासांत हिंदी भाषेच्या विकासाचा विचार केला आहे. ह्या खंडांत लेखकाने एके ठिकाणीं लिहिलें आहे की— " भाषाविज्ञानाचा हा दृष्टिकोण फार चमत्कारिक आहे की फारसी, ही भारतीय आर्य भाषा वर्गाची असूनसुद्धा विजातीय बनली आहे. आणि अवधी, जी वेगळीच भाषा होती, ती हिंदीचाच एक भाग आहे. " ( पृष्ठ १९ ) लेखकाने कोणत्या आधारावर अवधीला आर्यभाषावर्गापासून किंवा हिंदीपासून वेगळी भाषा मानली हें समजत नाही. अवधी भाषा तर अर्धमागधीपासून निघालेली भाषा मानली जात आहे. बिहारी भाषा हिंदींत अंतर्भूत करावी की नाही हा प्रश्न खरोखरीच भाषावैज्ञानिकांच्या पुढे आहे. अवधीच्या विषयीं मात्र असा विवाद नाही. ती हिंदीचीच विभाषा आहे. मिश्रबंधूंप्रमाणे ह्या लेखकाने-देखील दुसऱ्या खंडांत साहित्याची व्याख्या, रस इत्यादिकांचें विवेचन केलें आहे. तिसऱ्या खंडांत अपभ्रंशापासून रीतिकालापर्यंत असणाऱ्या विविध परिस्थितीचा आणि कवींचा टीकात्मक

परिचय करून दिला आहे. चतुर्थ खण्डाला आंग्लप्रभावकाल म्हटलें आहे. पांचव्या आणि सहाव्या खण्डांना : अनुक्रमें ' भारतेंदु युग ' आणि ' द्विवेदी युग ' नांवें दिलीं आहेत. आणि शेवटच्या खंडाला 'नवयुग' असें संबोधून इतिहास संपविला आहे. ह्या इतिहासांत साहित्यिकांच्या नांवाप्रमाणे विशिष्ट काळाचें नामकरण केलें आहे. आचार्य शुक्लजींनी युग-व्यक्तिपेक्षा युग-प्रवृत्तीला जास्त महत्त्व दिलें. जरी ह्या इतिहासांत आधुनिक काळांतील सर्व प्रवृत्ति आणि प्रवृत्तिकारांचें सम्यक् विवेचन नसलें तरी ह्यांत कांही नावीन्य अवश्य आहे.

सन १९५३ सालीं डॉ. हजारीप्रसाद द्विवेदींनी मानवतावादी दृष्टिकोण बाळगून अपभ्रंशकाळांतील प्राकृताचा आभास असणाऱ्या हिंदी साहित्यांत हिंदीच्या आदिकालाचें स्वरूप न्याहाळलें असून त्या काळापासून तर आधुनिक काळापर्यंतच्या प्रवृत्तींचा विवेचनपूर्ण इतिहास लिहिला आहे. पण हा विद्यार्थ्योपयोगी अधिक असल्याने संक्षिप्त स्वरूपाचा आहे. ह्या इतिहासांतील आदिकाल-आणि भविष्यकाल इतर कालांपेक्षा जास्त परिपुष्ट आहे. पण आधुनिक कालाचें विवेचन जर विस्तृत असतें तर अधिक योग्य झालें असतें.

वर सांगितलेल्या इतिहासांशिवाय इतर अनेक इतिहास शाळा—कॉलेजांतील विद्यार्थ्यां-करिता टिपणें म्हणून उपयोगी पडण्यासारखे आहेत. ह्यांत लेखकांचा स्वतंत्र दृष्टिकोण दिसून येत नाही, म्हणून ह्यांचें साहित्यिक व ऐतिहासिक महत्त्व फारसें नाही.

संपूर्ण इतिहासाशिवाय विशिष्ट युग आणि साहित्यप्रवृत्ति लक्षांत घेऊन हिंदींत कांही टीकात्मक इतिहास लिहिले गेले आहेत. डॉ. हजारीप्रसाद द्विवेदींनी " हिंदी साहित्याचा आदिकाल " मध्ये हिंदीच्या प्राकृताभास साहित्याचें शोधात्मक विवेचन केलें आहे. आधुनिक काळाच्या ५० वर्षांचें ( सन १८५०–१९०० ) विहंगमदृष्टीने अवलोकन डॉ. लक्ष्मीसागर वार्ष्णेय ह्यांनी आपल्या " आधुनिक हिंदी साहित्य " नांवाच्या प्रबंधांत केलें असून सन १७०१ ते १९२५ पर्यंतच्या काळाचें सिंहावलोकन श्रीकृष्णलाल ह्यांनी " हिंदी साहित्य का विकास " नांवाच्या प्रबंधांत केलें आहे. पं. रामचंद्र शुक्ल ह्यांनी आपल्या इतिहासांत सूत्र-रूपाने जें मांडलें होतें त्या माहितीची ह्या इतिहासकारांनी विस्तृत चर्चा केली आहे. श्री. भोलानाथ ह्यांनी सन १९२६ ते १९४७ पर्यंतच्या काळांतील हिंदी साहित्याचें सिंहावलोकन केलें आहे. ह्यांत लेखकाच्या घाईमुळे कुठे कुठे कांही मुद्दे राहून गेले आहेत. पण पं. रामचंद्र शुक्ल आधुनिक साहित्याविषयी जें विस्तृतरूपाने लिहूं शकले नाहीत तें ह्या इतिहासलेखकांनी विस्तृतरूपाने लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. डॉ. केसरीनारायण शुक्ल ह्यांनी " आधुनिक काव्यधारा ", डॉ. टीकमसिंह तोमर ह्यांनी " हिंदी वीर साहित्य ", श्री. ब्रजरत्नदास ह्यांनी ' हिंदी नाट्य साहित्य ', डॉ. सोमनाथ गुप्त ह्यांनी "हिंदी नाटक साहित्य का इतिहास", डॉ. दशरथ ओझा ह्यांनी "हिंदी नाटक : उद्‌भव आणि विकास," डॉ. भगवत्स्वरूप मिश्र ह्यांनी " हिंदी आलोचन : उद्‌भव आणि विकास " डॉ. भगीरथ मिश्र ह्यांनी "हिंदी काव्यशास्त्रा-चा इतिहास ", श्री. राजेश्वरप्रसाद चतुर्वेदी ह्यांनी रीतिकालीन कविता " आणि " शृंगार रसाचें विवेचन ", श्री. यू. सी. त्रिपाठी ह्यांनी " हिंदी निबंधाच्या विकासाचें टीकात्मक अध्ययन ", डॉ. शिवमंगलसिंह ' सुमन ' ह्यांनी "रीतिकाव्याचा उद्‌गम आणि विकास", श्री. लक्ष्मीनारायण लाल ह्यांनी " हिंदी लघुकथेचा जन्म आणि विकास " इत्यादि टीकात्मक इतिहासखंड लिहिले. त्यांच्यापैकी बहुतेक इतिहासांतून लेखकांची शोधकदृष्टि दिसून येते. कारण की हे इतिहास विश्वविद्यालयांमध्ये प्रबंध रूपाने लिहिले गेले.

हिंदी जगांत साहित्याच्या इतिहासलेखनाच्या दृष्टिकोणाचा एक विवाद्य प्रश्न आहे. राष्ट्रीय किंवा भारतीय दृष्टीने लिहिल्या गेलेल्या इतिहासांबद्दल शंका उद्‌भवते की इतिहासातील व्यापकता नष्ट व्हावी. शिवाय समाजवादी, द्वन्द्वात्मक भौतिकवादी दृष्टि पण अगदीच अनाठायी नव्हे. त्यामुळे साहित्य एका 'पाया'च्या चौकटींत जखडलें जाऊन रुद्ध होण्याचा संभव असतो. कारण कल्पनामूलक रसार्द्र रचना वर्ग-संघर्षांपुढे कशी टिकाव धरूं शकेल? म्हणून ह्या तथाकथित नवीन वैज्ञानिकदृष्टीने देखील आमचें काम भागणें अशक्य आहे. आम्हांला तर एका विशिष्ट काळांत, मानवमनाने चिंतन आणि भावना यांच्या द्वारा स्वतःला कशा रीतीने व्यक्त केलें आहे आणि त्यापासून आम्हांला काय प्राप्त झालें आहे हेंच समोर ठेवून साहित्यिक प्रगतीची परीक्षा करावी लागेल. कुठल्याहि 'वादा'च्या ( मग तो राष्ट्रवाद का असेना ) चष्म्याने पाहिलें असतां साहित्याची सहज स्वच्छंद गति दृष्टिआड होऊं शकते. जरी साहित्य एक अखंड परंपरा असलें तरी कालविभागणीच्या साह्याने त्याचे तुकडे पाडणें साहित्याच्या अखंडतेचा अव्हेर करणें होय. तथापि हें विसरून चालणार नाही की मानवमन एकावेळीं मुख्यत्त्वेकरून एकच भावना वारंवार व्यक्त करीत असतें! म्हणून प्रवृत्ति-विशेषाचा आधार घेऊन कालविभागणी करणें–वैज्ञानिक ठरेल. पं. रामचंद्र शुक्ल ह्यांनी आपल्या इतिहासांत प्रवृत्ति–विशेषाला धरून कालविभागणीची जी पद्धति सुरू केली, तिचा ती केवळ जुनी पद्धत म्हणून त्याग करणें योग्य ठरणार नाही. इतिहासकार इकडेतिकडे विखुरलेल्या तथ्यांना विभागतांना आपली दृष्टि पृथक ठेवून शकत नाही. समाज, राजनीति, संस्कृति सगळ्यांकडे त्याची स्वतःची दृष्टि असते, आणि ती त्याच्या इतिहासांत आपोआप प्रतिबिंबित होत असते. आपण त्याच्यापासून तटस्थतेची अपेक्षाच मुळी करूं शकत नाहीं.

हिंदींतील अनेक पिष्टपेषित इतिहासांच्यामुळे हिंदी साहित्याच्या आदिकालापासून आजपावेतों होण्याच्या प्रगतीचें खरेंखुरें ज्ञान होणें अशक्य झालें आहे. म्हणून काशी येथील मुख्य संशोधनसंस्था–नागरी प्रचारिणी सभेने–हिंदी साहित्याचा वृहत् इतिहास प्रकाशित करण्याची योजना आखली आहे.–ह्या इतिहासाचे सतरा भाग पाडण्यांत येतील. प्रत्येक भागाचें सम्पादन हिंदीचा प्रसिद्ध लेखक करील. इतिहासाची विभागणी पुढीलप्रमाणें आहे—

प्रथम भाग — हिंदी साहित्याची ऐतिहासिक पीठिका.
द्वितीय भाग — हिंदी भाषेचा विकास.
तृतीय भाग — हिंदी साहित्याचा उदय आणि विकास. विक्रमसंवत १४०० पर्यंत.
चतुर्थ भाग — भक्तिकाल – निर्गुण भक्ति. संवत १४०० ते १७०० पर्यंत
पाचवा भाग — भक्तिकाळ सगुणभक्ति संवाद. १४०० ते १७०० पर्यंत.
सहावा भाग — श्रृंगार काल — रीतिबद्ध. संवत १७०० ते १९००.
सातवा भाग — श्रृंगार काल — रीतिमुक्त. संवत १७०० ते १९००.
आठवा भाग —हिंदी साहित्याचें अभ्युत्थान : भारतेंदुकाल. संवत १९००ते१९५०.
नववा भाग — हिंदी साहित्याचा परिष्कार — द्विवेदी काल १९५० ते १९७५.
दहावा भाग — हिंदी साहित्याचा उत्कर्षकाल— काव्य. संवत १९७५ ते १९९५.
अकरावा भाग — हिंदी साहित्याचा उत्कर्षकाल — नाटक. १९७५–१९९५.
बारावा भाग — " " " उपन्यास, कथा, आख्यायिका.
संवत १९७५ ते १९९५.

तेरावा भाग — ” ” समालोचना, निबंध १९७५-१९९५.
चौदावा भाग — हिंदी साहित्याचा अद्यतन काल. संवत १९९५ ते २०१०.
पंधरावा भाग — हिंदी शास्त्र आणि विज्ञान.
सोळावा भाग — हिंदीचें लोक-साहित्य.
सतरावा भाग — हिंदीचें उन्नयन.

संपूर्ण इतिहास रॉयल आकाराच्या ६८०० पृष्ठांत संपेल आणि त्यावर २४८५९० रुपये खर्च करण्याचा अंदाज आहे. केंद्रीय सरकारने ५० हजार रुपयांचें अनुदान ह्या कार्याकरता दिलें आहे. सभेच्या कार्यकर्त्यांची खात्री आहे की पांच वर्षांत हें काम संपेल. हिंदी साहित्याची व्यापकता लक्षांत घेऊन बृहत् इतिहासाची अत्यंत आवश्यकता आहे. ह्याचें बरेचसें स्वरूप रामचंद्र शुक्लजींच्या इतिहासासारखें आहे. पण ह्यांत लोकसाहित्याकरिता एक खण्ड राखून ठेवला आहे. तसेंच शास्त्रविषयक आणि विज्ञानसंबंधी ग्रन्थांचा विचार करण्याची पण योजना आहे. ह्याप्रमाणे साहित्याला केवळ ललितवाङ्मयाच्या चाकोरींतून मुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. हिंदी साहित्याच्या ह्या विस्तृत इतिहासांत हिंदीला प्रभावित करणाऱ्या इतर देशभाषांच्या प्रवृत्तींचा जर विचार केला गेला असता तर हिंदी साहित्याची प्रगति अजमावण्याला बरीच मदत झाली असती. आनुषंगिक रीत्या हेंहि कार्य होईल. नागरी प्रचारिणी सभेचा हा प्रयत्न खरोखरीच अभिनंदनीय आणि अनुकरणीय आहे ह्यांत शंका नाही. तसेंच "एन्साइक्लोपीडिया" प्रमाणे ह्या इतिहासाचा उपयोग होऊं शकेल आणि एक मोठी उणीव भरून निघेल हेंहि तितकेंच खरें.

---

## म्हणून होत्या केवळ हासत.

आधारास्तव काठी घेउनि
जीर्ण घराच्या भिंति वाकल्या.
मुर्दाडाचें हास्य हासुनी
दावुं लागल्या जना वाकुल्या.
कौलारूचें छप्पर फुटकें
डोई घेउनि उभ्या राहिल्या
म्हातारीचें पोक काढुनी
ज्याला त्याला हसूं लागल्या.
जीर्ण घराच्या आंतील साऱ्या
जीवांची ती पाहुनि वळवळ
भिंति बोबड्या वदति तोतऱ्या
"फक्त अम्हांला कळली तळमळ."
भिंति वाकड्या वाकुन बघती
चिपडे डोळे करुनी किलकिल
शिळ्या चघळत्या तुकड्यासाठी
कुत्र्यांची ही येथील कलकल.

कळकटलेल्या भिंतींना ह्या
श्रावण सारा न्हाऊं लागला
आंतील भिजती थरथर पाहत
छप्पर अश्रू ठिबकुं लागला.
कुडकुडणारा कार्तिक आणिक
थरथरणारा आश्विन लपला
पडक्या भिंती आंतील उघड्या
मिठी मारुनी उबेस बसला.
वळवळ पाहुन भिंताडांतिल
सळसळ हसला चावट पिंपळ
पिसाट वारा झिंगत सुटला
तेथे गमतीखातर केवळ.
आधाराची काठी फेकुन
भिंती बसल्या पहात गंमत
छप्पर फुटकें डोई नव्हतें
म्हणून होत्या केवळ हासत.

— मनोहर तल्हार

---

# गेयता हें पद्याचें उद्दिष्ट का व्यवच्छेदक लक्षण ? :

वि. ज. सहस्रबुद्धे, मिरज

प्रस्तुत प्रश्नाच्या विवेचनास आरंभ करण्यापूर्वी प्रथमतः गद्य, पद्य, कविता व काव्य या शब्दांच्या अर्थाचा खुलासा करून ठेवणें जरूर आहे. कारण, यांपैकी पद्य व काव्य यांच्या अर्थासंबंधीं मतभेद होण्याचा संभव आहे. त्या मतभेदास जागा राहूं नये म्हणून सदर शब्दांच्या अर्थाबद्दल कोण लेखक काय म्हणतात, तें आरंभाला मुद्दाम देत आहें.

( १ ) "बहिरंगाकडे पाहिल्यास वाङ्मयाचे गद्य आणि पद्य असे दोन प्रकार आढळ-तात." ( छन्दोरचना पान २ )

( २ ) "ललित वाङ्मयाचे मुख्य दोन प्रकार आहेत. गद्य व पद्य." ( वृत्तें व अलंकार. पान १ )

( ३ ) "काव्य दोन प्रकारचें आहे. एक गद्यरूप आणि एक पद्यरूप." ( वृत्तदर्पण पान ७ )

( ४ ) "मनोरंजक व कल्पनारम्य अशा प्रकारची जी वाक्यरचना असते, तिला काव्य असें म्हणतात. गद्यांतहि अशा प्रकारची रचना असूं शकते व पद्यांतहि असूं शकते." ( मराठी साहित्य व व्याकरण. पान १६५ )

( ५ ) "वाङ्मयाचा आरंभ पद्यांतून झाला आहे व कांही काळपर्यंत त्याची वाढहि पद्यांतूनच झालेली आहे." ( पद्यप्रकाश. पान १६ )

( ६ ) "पद्य, कविता, काव्य हे शब्द समानार्थक भासतात आणि अविचारानें सर-मिसळ वापरले जातात. पण त्यांच्यांतला भेद उघड आहे. पहिल्या दोन शब्दांचा ( पद्य व कविता यांचा ) बाह्य स्वरूपाशीं व तिसऱ्याचा ( काव्याचा ) अन्तरंगाशीं संबंध आहे." ( समग्र केळकर साहित्यखंड. पान ५१ )

वरीलपैकी तात्यासाहेब केळकर यांचें मत अगदी स्पष्ट व योग्य आहे. तेंच मला ग्राह्य वाटतें. पद्य व काव्य हे शब्द भिन्नार्थक असल्याचें मीं गृहीत धरलें असून या लेखांत पद्या-संबंधींच विचार करण्याचा आहे. काव्यासंबंधीं विचार मला कर्तव्य नाही.

पद्याचें व्यवच्छेदक लक्षण सांगावयाचें म्हणजे गद्याहून पद्यरचनेचा निराळेपणा कोणता तो सांगितला म्हणजे पुरें होईल. परंतु हा विषय इतका साधा नाही. आपली उत्कट भावना अगर उत्कट विचार परिणामकारक रीतीने कवीला गद्यांत व्यक्त करितां येतो व पद्यांतहि व्यक्त करतां येतो. मग कवी आपली भावना गद्यांत व्यक्त करण्याचें सोडून पद्यांतच कां व्यक्त करतो ? असा मूलग्राही प्रश्न सहजच आपल्यापुढे उभा राहतो. म्हणजेच पद्याचें उद्दिष्ट कोणतें असा प्रश्न उत्पन्न होत असल्याकारणाने त्यासंबंधीं चर्चा करणें आवश्यक व इष्ट आहे.

एखाद्या गोष्टीचें उद्दिष्ट व तिचें व्यवच्छेदक लक्षण हीं वस्तुतः भिन्न असावयास पाहि-जेत व तशीं तीं भिन्न मानणें जरूरहि आहे. परंतु यासंबंधीं घोटाळा किंवा गोंधळ निर्माण होऊं शकतो. पद्याचें व्यवच्छेदक लक्षण व उद्दिष्ट या बाबतींत असाच गैरसमज उत्पन्न करणारी

अनुक्रमणिका

विचारसरणी, प्रा. माटे यांच्या 'रसवन्तीची जन्मकथा' या पुस्तकांत आढळून येते. पद्याचें व्यवच्छेदक लक्षण कोणतें ? तर गेयता; असें आपलें मत प्रा. माटे यांनी ठासून सांगितलें आहे. ते म्हणतात.

१ "...तथापि गेयता ही मात्र काव्यशरीराला तशीच चिकटून राहिली. अर्थात् यानंतर आपण काव्यवाङ्मयाकडे न्याहाळून पाहूं लागलों तर तदितर वाङ्मयापासून त्याला वेगळें करण्याचा धर्म फक्त त्याच्या गेयतेंत आहे, असें आढळून येऊं लागलें." (रसवन्तीची जन्मकथा. पान ६८)

२ "काव्याचें स्वतंत्रपण दाखवावयास आता गेयतेपलीकडे कांही राहिलेलें आहे असें म्हणतां येत नाही, म्हणून तीच त्याचें लक्षण अथवा व्याख्या, हें प्रमेय पतकरण्यास कोणी खळखळ करूं नये." (पान ७६)

३ "काव्याची गेयता, ही एकच व्यवच्छेदक खूण त्याच्यापाशी राहिली आहे व म्हणून तीच त्याची व्याख्या आहे." (पान ९५)

४ "गेयता व तिच्या अनुषंगाने अवतरणारीं तिचीं उपांगें, याशिवाय गद्याहून पृथक्त्व दाखविणारें कोणतेंहि लक्षण काव्यापाशी उरलेलें नाही व म्हणून तीच काव्याचें लक्षण मानावयास हरकत असूं नये." (पान १८७)

५ "गेयतेचें लोभनीय आवरण काढून घेतलें व तिच्या आनुषंगिकांनाहि परतवून लावलें तर काव्य जरी सुरस असलें तरी तितक्याच सुरस गद्यापेक्षा त्याच्यापाशी जास्त कांही शिल्लक राहणार नाही. म्हणून गेयता हीच काव्याचें लक्षण मानावयास हवी." (पान १८७)

वरील उताऱ्यांवरून प्रा. माटे यांचें मत स्पष्ट कळून येईल. त्यांनी ठिकठिकाणीं काव्य शब्दच वापरलेला असला तरी तो अन्वर्थक नाही. त्यांना अभिप्रेत शब्द 'पद्य' हाच दिसतो. काव्य व पद्य हे शब्द समानार्थक मानणें परिभाषेच्या दृष्टीने चूकच समजलें पाहिजे.

गद्याहून पद्याचें विशेषपण कशांत आहे याचें विश्लेषण प्रा. माटे यांनी पुष्कळच पाल्हाळाने केलें आहे. तें नीट विचारांत घेतलें असतां खरोखर त्यांचा हेतु पद्याचें उद्दिष्टच सांगण्याचा असावा असेंच वाटतें. तथापि निष्कर्ष काढतांना मात्र गेयता हें पद्याचें लक्षण होय असें मत त्यांनी देऊन ठेविलें आहे. परंतु हें त्यांचें मत आक्षेपार्ह आहे. कारण त्यामुळे उद्दिष्ट व लक्षण यांचा घोटाळा निर्माण झाला आहे. म्हणूनच हा विषय मीं चर्चेस घेतला आहे.

आता गेयता हें पद्याचें लक्षण नव्हे तर तें लक्षण दुसरें कोणतें ? असा उलट प्रश्न विचारला जाण्याचा संभव आहे. त्याचा खुलासा पुढे विवेचनाच्या क्रमांत योग्य स्थळीं येणार आहे. तो प्रस्तुत लेखाचा मुख्य विषय नव्हे. येथे अगोदर उद्दिष्टासंबंधीं विशेष चर्चा करणें अधिक जरूरीचें आहे.

उद्दिष्ट व व्यवच्छेदक लक्षण हीं भिन्न मानावीं लागतात. तीं भिन्न असलीं तरी त्यांचा परस्परसंबंधहि असूं शकतो. हा संबंध स्पष्ट करण्याकरिता परिचयांतलें एक उदाहरण देतों तें पहा.

काव्याचें (काव्य हें पद्यांत व गद्यांतहि असतें) उद्दिष्ट कोणतें ? तर रसप्रतीति. आणि काव्याचें लक्षण काय ? तर 'रसात्मकं वाक्यं काव्यम्' या काव्याच्या लक्षणांत उद्दिष्ट जो रस तो आलेला आहे. यावरून उद्दिष्टाचा लक्षणाशीं संबंध कसा येतो हें कळून येईल.

या विषयाच्या माहितीसाठी थोडा पत्रव्यवहार मीं केला आहे. त्यांपैकी प्रा. श्री. ना. बनहट्टी यांच्या उत्तरांतील जरुरीपुरता उतारा येथे देत आहे. प्रो. बनहट्टी कळवितात:

" उद्दिष्ट आणि व्यवच्छेदक लक्षण या दोन गोष्टी एक नव्हेत. उद्दिष्ट म्हणजे प्रयोजन• ज्याकरिता एखादी वस्तु वा क्रिया निष्पन्न होते तें त्या वस्तूचें वा क्रियेचें उद्दिष्ट ठरेल; व्यवच्छेदक म्हणजे इतरापासून निराळें करणारें लक्षण म्हणजे स्वरूपबोधक खूण, व्याख्या, गुण-विशेषांचें वर्णन होय. पुष्कळ वेळां उद्दिष्टाचा समावेश लक्षणांत होतो. तथापि उद्दिष्ट व लक्षण एक नव्हे. शरीरपोषण हें अन्नाचें उद्दिष्ट आणि 'सामान्यतः तोंडावाटें घेण्यांत येणारा शरीरपोषक पदार्थ' हें अन्नाचें लक्षण होऊं शकेल. उद्दिष्टाचा समावेश लक्षणांत कसा होतो हें यावरून कळून येईल. आता गेयता हें पद्याचें उद्दिष्ट होऊ शकेल की नाही ही गोष्ट गेयता याचा अर्थ काय केला जाईल त्यावर अवलंबून राहील."

वरीलप्रमाणे प्रा. वनहट्टी यांनी आपला अभिप्राय दिला आहे व तो माझ्या विचार-सरणीला अनुकूलहि आहे.

यानंतर प्रा. माटे यांच्याच पुस्तकांतील निराळ्याच अर्थाचे तीन उतारे यापुढे देत आहे. त्यांवरून गेयतेचा पद्याच्या लक्षणाशीं असणारा संबंध प्रा. माटे हेच कसा दाखवितात तो समजेल. प्रा. माटे म्हणतातः—

१ " वाक्याचा व वाक्यसमूहाचा अमुक एक प्रकारचा आकार असला तर त्याला गद्य म्हणावें व अमुक एक प्रकारचा निराळा आकार असला म्हणजे त्याला पद्य म्हणजे कविता म्हणावें असें प्राचीनांनी ठरवून टाकलें होतें...गेयतेस योग्य असा आकार आपल्या गद्याला माणसांनी दिला व त्याला तें पद्य असें म्हणूं लागले." ( पा. ७१ )

२ " गेयतेसाठी शब्दांची व शब्दसंहतीचीं स्थलान्तरें केलेलीं असतात. व नेहमीच्या वाक्यरचना विकृत केलेल्या असतात." ( पा. ७९ ).

३ " कविता ही गद्याहून जर एखाद्या कोणत्या विरोधाने निराळी असली तर कवि-तेच्या गेय वाक्यरचनेने होय. " ( पा. १६९ ).

प्रा. माटे यांच्याशिवाय आणखी इतर लेखकांचेंहि या बाबतींतलें म्हणणें देत आहे. त्यावरून वाचकांची अधिक खात्री होईल.

१ " कवीच्या विविध मनोगत स्वरान्दोलनाला ( म्हणजेच एक प्रकारच्या गेयतेला ) अनुकूल अशी रचना तो ( कवी ) अक्षरसंख्या, लगक्रम आणि यति इत्यादिकांना नियमबद्ध करून ठेवितो." ( छन्दोरचना. पा. ३ )

२ " गद्याचा गायनक्षेत्रांत अद्यापि तरी प्रवेश झाला नाही. गायनांत जे शब्द देतात ते कवितेंतील असतात म्हणजे कोणत्या तरी वृत्तांत किंवा साच्यांत बांधलेले असतात. " ( श्री. टेंबे. झंकार दिवाळी अंक १९४८ )

३ " शब्दगुणामध्ये श्रवणानुकूल पदरचना ही आनंदवाही असते. छन्द हें श्रवणानुकूल-तेचेंच एक अंग होय. म्हणूनच कवी छन्दांचें बंधन आपखुषीने लादून घेतो." ( काव्यालोचन पा. ९८ )

४ " खरा काव्यरस हा भावनेच्या उत्कर्षाशिवाय निर्माण होत नाही आणि भावनेला अनुकूल असें—म्हणजे छन्दोबद्ध, तालबद्ध, मर्यादित, मोजक्या गतीचें, शक्य तर सयमक, अनुप्रासयुक्त असें—वाहन न मिळालें तर तिच्या उद्गाराच्या परिणामाला कमीपणा येतो. " ( केळकर. साहित्य खंड पा. ५१ )

वरील निरनिराळ्या लेखकांच्या मतांचा विचार करितां गेयतेला साधनीभूत असणारी शब्दरचना त्यांना अपेक्षित आहे असें निष्पन्न होतें. हीच गोष्ट खुलाशाने सांगावयाची म्हणजे

विशिष्ट अक्षरसंख्येने किंवा विशिष्ट अक्षर मात्रासंख्येने निबद्ध व विशिष्ट चालीला किंवा गेयतेला आवश्यक त्या विरामांना उपयुक्त, अशा रचनेच्या ज्या शब्दपंक्ति किंवा चरण ( साधारणत: दोन अथवा चार ) त्यांना पद्य म्हणतां येईल. अर्थात् हेंच पद्याचें लक्षण होय. ' गेयतेचें वाहन तें पद्य.' ही तात्यासाहेब केळकरांची सूत्रात्मक व्याख्यासुद्धा लक्षांत घेण्यासारखी आहे.

असो. येथवर जें विवेचन केलें आहे त्यांत उद्दिष्ट व लक्षण यांचा संबंध दाखवून दिला आहे आणि ' गेयता हें पद्याचें लक्षण ठरतें काय? ' असा जो मुख्य प्रश्न त्यासंबंधीचें माझें उत्तर स्पष्ट केलें आहे. तें उत्तर म्हणजे गेयता हें पद्याचें लक्षण ठरत नसून गेयता हें पद्याचें उद्दिष्टच समजणें इष्ट व योग्य होईल. ' गेयतेस योग्य असा आकार आपल्या गद्याला माणसांनी दिला.' असें विधान खुद्द प्रा. माटे यांनीच केलें आहे. एवढें विधान जरी लक्षांत घेतलें तरी त्यांच्या प्रतिपादनांत विसंगति असल्याचें उघड होत आहे. तेव्हा याहून अधिक चर्चेची जरूरी नाही.

आता प्रस्तुत चर्चेतील महत्त्वाचा शब्द जो गेयता, त्याच्या अर्थाविषयी शक्य तो खुलासा करणें आवश्यक आहे. गेयता म्हणजे काय समजावयाचें याची कल्पना विशद केली नाही तर विवेचनांत संदिग्धता व अपुरेपणा राहणार म्हणून त्या विचाराकडे वळतों.

गेयतेच्या स्वरूपासंबंधी इतर लेखकांचे अभिप्राय वेळोवेळीं व्यक्त झालेले आढळून येतात. तेव्हा त्यांचा उपयोग या ठिकाणीं करण्यास हरकत नाही. यासाठी ते अभिप्राय यापुढे थोडक्यांत उद्धृत करीत आहें.

१ " काव्यलेखनाचे वेळीं कवी स्वतःशीं गुणगुणत असेल व काव्यवाचकहि वाचतांना मनांतल्या मनांत एक प्रकारच्या गेयतेचा अनुभव घेत असेल. परंतु ही गेयता म्हणजे संगीत नव्हे. " (—य. र. आगाशे, महाराष्ट्र साहित्य पत्रिका. जुलई १९४४ )

२ " गेयतेच्या दृष्टीने पाहतां ही गेयता संगीतशास्त्रांत बसणार नाही. अगदी प्राथमिक स्वरूपाची असेल. पण ओबडधोबड, कानाला अगदी ढोबळपणें कळणारा हा जो सुरेलपणा, तो पुनरावृत्तीने पुन्हा कानीं आला तरच गद्यापेक्षा वेगळा. " ( डॉ. कमळाबाई देशपांडे, संगम. मार्च १९५२ )

३ " पद्य चालीवर वाचतां येतें. चाल चांगली असेल तर आपण कविता गाऊन दाखवूं शकतों. गाऊन दाखवितां येण्यासारख्या खूपच कविता असतात. किंबहुना सर्वच पद्यवाङ्मयांत गाण्याला किंवा चालीवर म्हणण्याला योग्य असे गुण असतात. या गुणांस गेयता असें म्हणतात. " (प्रा. वि. म. कुलकर्णी. वृत्तें व अलंकार. पान १)

४ " एखादें पद्य थोडेसें गळ्यावर म्हणावयाचा प्रयत्न करूनहि त्याला चाल लागली नाही तर तें म्हणावेंसेंच वाटत नाही. संस्कृत छन्दःशास्त्रांतील कित्येक वृत्तांचीं उदाहरणें सुप्रसिद्ध कवींच्या कृतींत आढळत नाहीत अथवा अत्यंत वैरल्याने आढळतात. याचें मुख्य कारण हेंच की, त्यांना एखादी मधुर चाल सहज नि सरळ लागूं शकत नाही. ( छन्दोरचना. पा. १३ )

वर दिलेल्या उताऱ्यांवरून गेयतेचें स्वरूप कोणीं कसें सांगितलें आहे तें कळून येईल. गेयतेच्या अर्थाविषयी कल्पनाच आणून देतां येण्यासारखी आहे. गेयतेची निश्चित व्याख्या सांगणें अवघड आहे; प्रा. माटे यांनीसुद्धा व्याख्या दिली नाही. गेयता म्हणजे प्रत्यक्ष संगीत नव्हे व गद्याचें उच्चारणहि नव्हे. अशा मधल्या अवस्थेतील पद्य म्हणण्याची जी चाल, त्या चालीपासून एक प्रकारची श्रवणमधुरता अनुभवायास मिळते, तिला गेयता असें संबोधितां येईल, असें मला वाटतें. या चालींत गद्योच्चाराहून निराळेपणा असून शिवाय गोडवा असतो.

अनुक्रमणिका

तसेंच गद्याप्रमाणे अर्थाला धरून विराम नसून चालीला धरून यति असतात. या तिन्ही गोष्टी गेयतेचें स्वरूप जाणून घेतांना गृहीत धराव्या लागतात. कांहीं झालें तरी गेयतेचा अर्थ मोघमच सांगतां येतो. अशा प्रकारें गेयता म्हणजे काय तें कळलें तरी आणखी एक गोष्ट लक्षांत घ्यावी लागते. ती म्हणजे ही अपेक्षित गेयता सर्व पद्यप्रकारांमध्ये एकसारखीच असते असें मात्र नाही. गेयते-गेयतेमध्ये फरक असलेला आढळतो. ओवी, अभंग, शार्दूलविक्रीडित, मालिनी इत्यादि वृत्तें, साकी दिंडी वगैरे जाति, यांच्या प्रत्येकाच्या चाली वेगवेगळ्या आहेत व त्यांतील गेयतेंत भिन्नपणा आहे.

गेयतेच्या फरकाच्या कारणाचा विचार करितांना पद्यरचनाप्रकारांतील एक महत्त्वाचा भेद आढळून येतो, त्याचाहि खुलासा करणें क्रमप्राप्त आहे. गेय कविता व पाठ्य कविता असे कवितेचे दोन भेद कोणी दाखवितात. अशा वेळीं गेय कविता म्हणजे तालाला उपयुक्त रचनेची कविता आणि पाठ्य कविता म्यणजे तालनिरपेक्ष रचनेची कविता, असाच त्याचा अर्थ समजणें इष्ट आहे. या बाबतींत आधारासाठी प्रा. रा. श्री. जोग यांचा अभिप्राय देतां येण्यासारखा आहे. ते म्हणतात :—

१ "एखादा वाक्यार्थ गेय कां होतो व दुसरा गेय कां होत नाही याचें एक उत्तर असें की, ज्या वाक्यरचनेंत तालबद्धता असते तें गेय होतें."

२ "वसन्ततिलका, मालिनी, अथवा शार्दूलविक्रीडित इत्यादि अक्षरगणवृत्तांमधील गेयता तालावर अवलंबून नाही. मात्र ताल नसला तरीहि एक प्रकारची गेयता त्यांत आहे. ही गोष्ट निर्विवाद आहे तिचें विशिष्ट असें कारण सांगतां येत नाही." (अभिनव काव्य-प्रकाश. पान ३२५।३२६.)

वरील पाठ्य व गेय कविता, या भेदाला अनुसरून गेयतेचें स्वरूपहि दोन प्रकारचें मानावें लागेल. एक सताल स्वरूपाची गेयता व दुसरी अताल स्वरूपाची गेयता. प्रा. जोग यांच्या अभिप्रायाप्रमाणे दिंडी, साकी अशा जाति-स्वरूपाच्या पद्यरचनेंतील गेयता सताल असून शिखरिणी, मालिनी इत्यादि अक्षरगणवृत्तांच्या चालींतील गेयता तालबद्ध नसते. म्हणून गेयतेचा अर्थ जो समजावयाचा तो वरील दोन्ही प्रकारांना सामावून घेणारा असला पाहिजे.

यानंतर आणखीहि एक मुद्दा विचारांत घेतला पाहिजे. पद्याचें लक्षण निराळें व उद्दिष्ट निराळें, असें मानलें तरी पद्याचें एकमेव उद्दिष्ट गेयता हेंच समजावें काय ? असा प्रश्न उत्पन्न होणें संभवनीय आहे. कोणी म्हणेल की, गेयता हें पद्याचें एकमेव उद्दिष्ट नव्हे तर तें पद्याचें मुख्य उद्दिष्ट समजणें योग्य आहे. पद्य हें स्मरणांत राहण्यास सुलभ असतें किंवा पाठ करण्यास उपयुक्त असतें, इत्यादि दुसरे अनेक गुण पद्याचे आहेत. (तात्यासाहेब केळकरकृत पद्यगुच्छ पान २ यांत पद्याचे आठ गुण निर्दिष्ट केले आहेत.) तेव्हा या गुणांचा समावेश पर्यायाने किंवा गौण तऱ्हेने कां होईना, पद्याच्या उद्दिष्टांत करण्यास कांही हरकत नाही असें कोणी म्हणूं शकेल व तें साहजिकहि दिसतें. परंतु हा मतभेदाचाच मुद्दा राहणार आहे. या बाबतींत मी असें समजतों की, गेयता हें पद्याचें एकमेव उद्दिष्ट म्हणा अथवा मुख्य उद्दिष्ट म्हणा; माझ्या मुख्य निर्णयाला त्यामुळे कांही बाध येणार नाही. गेयता हें पद्याचें लक्षण नव्हे एवढें मात्र खरें.

असो. वादाचा मुख्य प्रश्न होता त्यासंबंधीं जरूर तेवढें विवेचन येथपावेतों केलें आहे. आता आनुषंगिक विषयाचा थोडा अधिक खुलासा उदाहरणांसह यापुढे करणार आहे व प्रस्तुत लेख पुरा करीत आहे.

गेयते-गेयतेमध्ये फरक असतो असें वरतीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. या फरकाचे मुख्य दोन भेद. पहिला भेद असा कीं, पद्याची जाति एकच; पण तिला चाली भिन्न लावल्यामुळे गेयतेंत दिसून येणारा फरक. या फरकावद्दल तात्यासाहेब केळकर काय म्हणतात तेंहि पहा.

"पुष्कळ वेळां तितक्याच गणसंख्येचीं पद्यें असतांहि केवळ चाल वेगळी म्हणून वेगळीं वाटतात; पण चाल या शब्दानें नुसता ताल नसून संगीत स्वररचनाहि असते. यामुळे वेगळेपणा दिसतो पण तो खरा नव्हे." (केसरी ता. १३-९-२७)

या फरकाचीं नमुन्यादाखल दोन उदाहरणें देत आहे :—

१ जाति, चंद्रकांत. चरणीं मात्रा २६

॥ वत्सागर तुम्हि वीर शिरोमणि, कोठे तरि रमला ॥ (संगीत सौभद्र)
॥ धन्य शिवाजी तो रणगाजी, धन्यचि तानाजी ॥ (सावरकरकृत पोवाडा) ॥
॥ घनश्याम सुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला ॥ (प्रसिद्ध भूपाळी)
॥ कधि ग भेटशिल अता जिवाचे, जिवलग मैतरणी ॥ (प्रभाकरकृत लावणी)

२ जाति, हरिभगिनी. चरणीं मात्रा ३०

॥ प्रियकर माझे भ्राते मजवरि निष्ठुरता हृदयीं धरती ॥ (संगीत सौभद्र)
॥ बिकट वाट वहिवाट नसावी, धोपट मार्गा सोडुं नको ॥ (फटका, वृत्तदर्पण)
॥ यापरिचें भव-ताप-विमोचन चापशरांकित भव्यमती (मदिरावृत्त)

याशिवाय साकी, भूपती, पारिलीना, पादाकुलक यांचींहि उदाहरणें देतां येतील, पण त्यायोगें विस्तार होईल म्हणून नकोत.

आता शब्दरचनेंत बदल केल्याने गेयतेंत फरक कसा पडतो तो प्रकार दाखवून द्यावयाचा आहे. हा प्रकार कांही थोड्या कवितांपुरताच जमणारा आहे. या प्रकाराला उपयुक्त अशी एखादी कविता म्हणण्यासाठी प्रथम घ्यावयाची असून नंतर तिच्या चरणामधील कांही शब्द जागा बदलून त्याच चरणांत ठेवावयाचे, आणि असें केल्यावर त्या कवितेचें पहिलें वृत्त अगर जाति बदलतां येते आणि मूळ वृत्तांत अगर जातींत बदल झाल्याकारणाने गेयतेंतहि साहजिक फरक पडतो. याचीं कांही उदाहरणें पुढे देत आहें. त्यांवरून वाचकांना वरील प्रकाराचा प्रत्यक्ष अनुभव पाहतां येईल. हीं उदाहरणें त्यांना मनोरंजकहि वाटतील.

१ पहिलें उदाहरण—वृत्त शार्दूलविक्रीडित.

॥ म्हातारी उडतां नयेचि तिजला, माता मदीया अशी
॥ कान्ता ती नुकती प्रसूत सदनीं, साता दिसांची असे
॥ पाता त्या उभया असून बघ मी, हा घात योजी विधी
॥ हातीं मी नृपते त्वदीय गवसे, आता करावें कसें

(बदल करून) गीति.

॥ माता अशी मदीया, तिजला उडतां नयेचि म्हातारी
॥ सदनीं प्रसूत नुकती, कान्ता साता असे दिसांची तो
॥ पाता असून उभया, त्या मी बघ घात हा विधी योजी
॥ हातीं त्वदीय गवसे, आता नृपते कसें करावें मी

(बदल करून) जाति, हरिभगिनी.

॥ नयेचि उडतां तिजला माता, अशी मदीया म्हातारी
॥ कान्ता नुकती प्रसूत सदनीं, असे दिसांची साता ती

॥ असून उभया त्या पाता मी, घात विधी हा वध योजी
॥ हातीं नृपते त्वदीय गवसे, कसें करावें आता मी
२ दुसरें उदाहरण. वृत्त मालिनी
॥ अनुदिन अनुतापें तापलों फार राया
॥ रघुपति करुणाब्धे, नीरसी सर्व माया
॥ अचपळ मन माझें, आवरूं ये न त्यातें
॥ तुजविण शिण होतो, शान्तवी शीघ्र मातें
(बदल करून) जाति, भूपती.
॥ अनुतापें अनुदिन, फार तापलों राया
॥ करुणाब्धे रघुपति, सर्व नीरसी माया
॥ मन माझें अचपळ, ये न आवरूं त्यातें
॥ शिण होतो तुजविण, शीघ्र शान्तवी मातें
३ तिसरें उदाहरण वृत्त इंद्रवंशा.
॥ जे पूर्वजन्मान्तरिं पुण्य जोडिती ॥
॥ ते राजवंशामधि जन्म पावती ॥
॥ त्या दे न पीडा कधि दैन्य आपदा ॥
॥ ते सौख्य नानाविध भोगिती सदा ॥
(बदल करून) जाति, दिंडी.
॥ पूर्वजन्मान्तरिं, पुण्य जोडिती जे ॥
॥ राजवंशामधि, जन्म पावती ते ॥
॥ दे न पीडा कधि, दैन्य आपदा त्या ॥
॥ सौख्य नानाविध, भोगिती सदा ते ॥
४ चौथें उदाहरण, अभंग
॥ काय तुझें वेंचे मला भेट देतां
थोडकें बोलतां माझें सर्वे ॥
॥ काय तुझें रूप घेतों मी चोरुनि
राहसी लपोनी भेणें वृथा ॥
॥ काय तुझें व्हावें आम्हांस वैकुंठ
भेवो नको भेट आता मला ॥
॥ तुकाराम तुझी न मागे दसोडी
दर्शनीं आवडी आहे परी ॥
(बदल करून) वृत्त, मंदारमाला.
॥ वेंचे तुझें काय देतां मला भेट माझे सर्वे बोलतां थोडकें ॥
॥ घेतों तुझें रूप चोरूनि मी काय भेणें लपोनी वृथा राहसी ॥
॥ आम्हांस व्हावें तुझें काय वैकुंठ भेवो नको भेट आता मला ॥
॥ तुझी न मागे दसोडी तुकाराम आहे परी आवडी दर्शनीं ॥
अशीं हीं चार उदाहरणें दिलीं आहेत. यांशिवाय, मालिनी वृत्ताचें 'युगें आठावीस'०

या स्वरूपाच्या आरतींत व अष्टाक्षरी अभंगाचें अनुष्टुभ् वृत्तांत रूपान्तर होऊं शकतें. परंतु तीं उदाहरणें विस्तारभयास्तव गाळलीं आहेत.

## पुरवणीदाखल टीप.

१ गेयतेसंबंधी संस्कृत छन्दःशास्त्रकारांनी काय म्हटलें आहे हेंहि पाहणें जरूर आहे. ' गेयता ' असा शब्द त्यांनी वापरलेला आढळत नाही. तथापि, पद्यरचना करितांना काय साधावें लागतें याची चर्चा त्यांनी केली आहे. वृत्त म्हणण्याच्या विवक्षित चालीला अडथळा येईल, असे अक्षरगण म्हणजे अशा लघुगुरुक्रमाचीं अक्षरें वृत्ताच्या चरणांत असूं नयेत, ही गोष्ट त्यांनीं चर्चेत निदर्शनास आणून दिली आहे. आणि त्या चर्चेचा निष्कर्ष काढतांना त्यांनी रचना करतेवेळीं जें कांही साधावयाचें असतें, त्या उद्दिष्टाला ' उच्चारण-सामंजस्य ' असा पारिभाषिक शब्द वापरला आहे. ते म्हणतात ( शार्दूलविक्रीडिताचें उदाहरण घेऊन )

" मसजसततगेषु हि वर्णैः अभिनीयमानेषु उच्चारयितुः ' उच्चारणसामंजस्यम् ' अनुभूयते । जसयोः स्थाने तभयोः संनिवेशे तु अवश्यम् उच्चारणक्लिष्टता भवति । "

( पिंगलछन्दःशास्त्रस्य भूमिका पान ४४ ).

हें ' उच्चारणसामंजस्य ' म्हणजेच मराठी छन्दःशास्त्रांत संबोधिली जाणारी चाल अगर गेयता असें समजतां येईल काय ? असा प्रश्न आहे. त्याचा विचार छन्दःशास्त्रज्ञांनी करावा.

२ श्री रघुनंदनशास्त्रीकृत हिन्दी छन्दःप्रकाश पान ४ यांत सदर संबंधीं म्हटलें आहे तें असें:—

" अपने मूल रूप में छन्द, वस्तुत: किन्ही छोटी बडी ध्वनियों के व्यवस्थित सामंजस्य का ही नाम है । प्राकृतावस्था में यह सामंजस्य अवश्य ही स्वयंजात या स्वतःप्रसूत (स्पॉन्टेनिअस्) होगा । इसकी स्वरमाधुरी और लयपर आदिमानव अवश्य ही मुग्ध हुआ होगा।

३ छन्दःशास्त्राची परिभाषा या प्रकरणांत दुसरा पारिभाषिक शब्द ' गति ' असा दिला आहे. तो मराठी छन्दःशास्त्रांतील ' चाल ' या शब्दाशीं समानार्थक दिसतो. ' गति ' याचा अर्थ रामनरेश त्रिपाठी यांनी सांगितला आहे तोहि येथें देतों:—

" प्रत्येक छन्द में एक प्रकार की गति अर्थात् पाठप्रवाह का ढंग भी होता है। इस का कोइ खास नियम नही बतलाया जा सकता । इसका जानना केवळ अभ्यास पर निर्भर है। " ( हिंदी पद्यरचना पान ४ )

' गति ' संबंधीं संस्कृत छन्दःशास्त्रकारांनी म्हटलें आहे तें असें—

" प्रस्तारप्रतिपन्नानाम् स्वरूपाणाम् मध्ये यानि यानि गतिसंपन्नानि स्युः तानि तानि... छन्दांसि भवन्ति " ( भूमिका पान ४८ )

वरील ' उच्चारणसामंजस्य ' व ' गति ' या दोन्ही शब्दांबद्दल प्रो. माधवराव पटवर्धन यांनी आपल्या छन्दोरचनेंत कांहीच चर्चा केली नाही. कोणत्याहि शास्त्रांत परिभाषा ठरविणें अगत्याचें असतें म्हणून हे दोन्ही शब्द वाचकांपुढे विचारार्थ ठेविले आहेत.

अनुक्रमणिका

# पातंजल महाभाष्याचा मराठी अनुवाद

म. दा. साठे.

## महाभाष्याचें महत्त्व

प्राचीन कालापासून आजपावेतों अनेक शास्त्रग्रंथांवर भाष्यें झालीं. व्याकरण, न्याय पूर्व मीमांसा, वेदांत, योग, ज्योतिष हीं सर्व शास्त्रें व दर्शनें मूळचीं सूत्रबद्ध असल्यानें तीं कालांतरानें दुर्बोध झालीं म्हणून त्यांवर वृत्ति, भाष्य, वार्तिकें व टीका अशा चार प्रकारचे ग्रंथ झाले. पण या सर्वांत पाणिनिकृत 'अष्टाध्यायी' या सूत्रबद्ध व्याकरण-ग्रंथावर पतंजलीने जें भाष्य लिहिलें त्यासच 'महाभाष्य' म्हणण्याचा परिपाठ आहे.

## भाष्याची व्याख्या :—

सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुकारिभिः ।
स्वपदेनच वर्ण्यन्ते भाष्यं भाष्यविदो विदुः ॥

सूत्रांतील शब्दांसारख्याच शब्दांनी ज्या ठिकाणीं सूत्रांचा अर्थ दाखविला जातो आणि आपणच उच्चारलेल्या पदांचा म्हणजे वाक्यांचा अर्थ आपणच सांगतों त्याला 'भाष्य' म्हणतात. वार्तिकांपेक्षा भाष्याची कामगिरी वेगळी आहे. यांत केवळ सूत्रांचें स्पष्टीकरण नसून सूत्रांच्या अर्थावर व प्रतिपाद्य विषयावर जे आक्षेप घेतले जाणें शक्य असतें त्यांचा परिहार, सूत्रांचें पांडित्यपूर्ण विवेचन व प्रतिपाद्य विषयाचें स्पष्टीकरण यांचा भाष्यांत समावेश होतो. 'वृत्ति' ग्रंथ केवळ सूत्रांचा सरळ अर्थ उदाहरणें देऊन करितात. अष्टाध्यायीवरील जयादित्य-वामन यांची काशिकावृत्ति पाहिल्यास वरील म्हणणें स्पष्ट होईल.

## संस्कृत व्याकरणाचें मुनित्रय

संस्कृत व्याकरणाचें मुनित्रय प्रसिद्ध आहे. तें म्हणजे पाणिनि, कात्यायन आणि पतंजलि म्हणजे अनुक्रमें सूत्रकार, वार्तिककार व भाष्यकार. या मुनित्रयाला ग्रंथारंभीं वंदन केल्याशिवाय सामान्यतः व्याकरण-ग्रंथकार आपल्या ग्रंथाला प्रारंभ करीत नाहीत.

प्राचीन गद्यग्रंथांत ब्राह्मणग्रंथ, आरण्यकग्रंथ व उपनिषदें सोडल्यास 'व्याकरण महाभाष्य' हा सर्वांत श्रेष्ठ असा प्राचीन ग्रंथ समजला जातो. शेक्सपिअर आणि ब्रिटिशसाम्राज्य या दोहोंपैकी एक सोडण्याची पाळी आली तर ब्रिटिशसाम्राज्य गमावण्यास तयार होऊं हें जसें इंग्रज लोक मोठ्या अभिमानानें म्हणतात त्याच प्रकारचा उल्लेख पतंजलीच्या महाभाष्यासंबंधीं 'महाभाष्यं वा पठनीयम् महाराज्यं वा पालनीयम्' असा प्रसिद्ध आहे. यावरून महाभाष्याची योग्यता व महत्त्व किती आहे हें कळून येईल.

## पाणिनीची अष्टाध्यायी

पाणिनीच्या व्याकरणग्रंथास 'अष्टाध्यायी' म्हणतात; यावरून या ग्रंथाचे आठ अध्याय आहेत हें स्पष्ट आहे. प्रत्येक अध्यायाचे चार पाद आहेत. या आठ अध्यायांत एकूण ३९९६ सूत्रें आहेत.

पाणिनीनें आपला सूत्रबद्ध ग्रंथ अत्यंत योजनापूर्वक रचिला. हा ग्रंथ मूळ संहितेच्या स्वरूपांत होता व पुढे त्यांतील सूत्रें वेगवेगळीं करण्यांत आलीं. कांहीं सूत्रांचा अर्थ स्पष्ट झाला नाहीं तर कात्यायन आणि पतंजलीसुद्धा त्यांची वेगळी फोड सुचवितात. अशा प्रक्रियेला 'योग-विभाग' असें म्हणतात.

अनुक्रमणिका

या चार हजार सूत्रांपैकी १२२८ सूत्रांवर कात्यायनानें वार्तिकें रचिलीं. यांपैकी ७०९ वार्तिकें सूत्रांचा अर्थ स्पष्ट करणारीं आहेत, तर ५३७ वार्तिकें त्यांचा अर्थ कमी-अधिक करणारीं आहेत. पतंजली या सर्व वार्तिकांचा परामर्श घेतो. शिवाय ४३५ सूत्रांवर वार्तिकें नसून केवळ भाष्य आहे. ३६ सूत्रांवरील वार्तिकांचें पतंजलि खंडन करतो. अष्टाध्यायीं-तील सर्वच सूत्रांवर भाष्य नसून त्यांपैकीं १६८९ सूत्रांवरच भाष्य आहे.

पतंजलीने आपलें भाष्य ८५ आह्निकांत रचिलें. 'आह्निक' हा शब्द अहन् शब्दा-पासून झाला हें उघड आहे. म्हणजे एका दिवसांत शिष्यांना पाठरूपाने जेवढें सांगून होईल तेवढ्या प्रकरणाला 'आह्निक' म्हणत असावेत यावरून ८५ दिवसांत हें भाष्य संपूर्ण सांगून झालें असावें असें म्हणण्यास हरकत नाही. या ८५ आह्निकांपैकी मुख्य महत्त्वाचे नऊ आह्निकें प्रथमाध्यायाच्या पहिल्या पादावर आहेत. एवढ्या भागाला 'नवाह्निकी भाष्य' म्हणतात. पाठशालांतून एवढाच भाग शिकण्याचा व शिकविण्याचा प्रघात असे. इतकें शिकून झाल्यावर इतर भाग स्वबुद्धीने वाचावा अशी अपेक्षा असे. कारण या भागांत पतंजलीची लेखन-शैली व महत्त्वाच्या सिद्धांतांचें विवेचन हीं आत्मसात् झाल्यानंतर पुढील भाग फारसा कठीण वाटत नाही.

महाभाष्याची शैली फारच सुंदर व कांही ठिकाणीं संवादात्मक आहे. स्वतःच शंका उत्पन्न करून त्याचें उत्तर अनेक लौकिक व व्यवहारांतील दाखले देऊन लहान मुलांस सोपें करून सांगावें अशा पद्धतीने दिलें आहे.

पाश्चात्य विद्वान मुख्यतः गोल्डस्टुकर, बर्नेल, किलहॉर्न, वेबर, रेनु, विंटरनिट्झ, फिजगेट, थीम, एडगर्टन इत्यादींनी या ग्रंथाची अपरंपार स्तुति केली असून डॉ. किलहॉर्नेनें तर महाभाष्याचें संशोधन व संपादनहि केलें आहे! इतकें असूनहि महाभाष्य कालांतराने समजण्यास व स्पष्टार्थ होण्यास कठीण जाऊं लागलें. म्हणून पुढें भर्तृहरीने त्रिकांडात्मक 'वाक्य-पदीय' ग्रंथ लिहून त्यावर 'महाभाष्यप्रदीपिका' टीका लिहिली.

परंतु दिवसेंदिवस संस्कृत अध्ययनाध्यापनाचा ऱ्हास होत चालल्यामुळे जुन्या परंपरेंतील विद्वान कमी होत चालले. आज मितीस महाराष्ट्रांत किंबहुना अखिल भरतखंडांत कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या मृत्यूनंतर भाष्याचें अध्ययन केलेले व तें शिकवूं शकणारे त्यांच्या तोलाचे पंडित विरळाच आहेत असें म्हणावें लागेल!

### कै. म. म. वासुदेवशास्त्री यांची कामगिरी

जुन्या परंपरेंतील नागोजीभट्टांच्या कालखंडांतील नांव घेण्याजोगे जवळजवळ अखेरचे पंडित म्हणजे कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर होत. महाभाष्याचें भाषांतर बिनचूक व रहस्य विशद करणारें व्हावयाचें म्हणजे त्यावरील मुख्य मुख्य टीकांचे, विशेषतः भर्तृहरीची महाभाष्य 'प्रदीपिका', त्याचप्रमाणे कैयटाचा 'प्रदीप' व त्यावर नागेशाचा 'उद्योत' हीं विचारांत घेतलीं पाहिजेत. शास्त्रीबोवांचें या ग्रंथांचें ज्ञान पूर्ण असल्याने त्यांनी केलेला अनुवाद हा किती यथार्थ झाला आहे हें त्या विषयांतील तज्ञच जाणतील. मराठी भाषेवर हे त्यांनी फार मोठे उपकार करून ठेविले आहेत.

### प्रो. का. वा. अभ्यंकर यांची प्रस्तावना

हें भाषांतर प्रसिद्ध झालें खरें, पण सामान्य वाचकाला तें समजणें कठीण जरी नसलें तरी सहजसाध्य नाही. याचें कारण असें की महाभाष्य हें पाणिनीच्या अष्टाध्यायिवर आहे. व

मूळ ग्रंथाचेंच जर अध्ययन नसलें तर त्यावरील भाष्य कसें समजणार? पाणिनीच्या ग्रंथांत अनेक परिभाषा, संज्ञा, न्याय, सिद्धांत, पाणिनिपूर्वकालीन टि, घु, भ इत्यादि अर्थहीन संज्ञा, अधिकार, इत्संज्ञा, प्रत्याहार, पद, आगम, आदेश, त्रिपादी, सपादसप्ताध्यायी वगैरे इतक्या भरून आहेत की मुळांत थोडाबहुत प्रवेश असल्याशिवाय महाभाष्याचें मराठींत भाषांतर असूनहि समजण्यास कठीण जाईल. ग्रंथांत या सर्व गोष्टींचें विवरण व अनेक वादांचे पूर्वपक्ष व उत्तरपक्ष अशी मांडणी जागजागीं आह्निकांतून केली आहे.

या सर्वांचा परामर्श प्रो. काशिनाथपंतांनी साकल्याने आपल्या प्रस्तावनेंत घेतला आहे. हा ५०० पृष्ठांचा प्रस्तावनेचा सातवा भाग माझ्या मतें तर महाभाष्याच्या अनुवादरूप मंदिरावर कळसासारखा शोभून दिसेल !

या प्रस्तावनेचे मुख्य चार भाग केले आहेत ते येणेप्रमाणे:—

(१) भूमिका - यांत व्याकरणशास्त्राचें अध्ययनाध्यापन व प्रसिद्ध वैयाकरणांचा अल्प परिचय दिला आहे. (२) प्रस्तावना—हा भाग खुद्द शास्त्रीबोवांचा असून यांत व्याकरणविषयक मुख्य मुख्य सिद्धांतांचें परीक्षण केलें आहे. (३) उपोद्घात—यांत पाणिनिपूर्व वैयाकरणांच्या कार्याचा परामर्श, पाणिनींच्या अष्टाध्यायीचें समालोचन, वार्तिककारांच्या कार्याचें समालोचन, महाभाष्याचें चिकित्सात्मक अवलोकन व प्रत्येक आह्निकांतील महत्त्वाचा सारांश, भर्तृहरीचें व्याकरणविषयक कार्य व व्याकरणशास्त्राचा संक्षिप्त इतिहास आहे. (४) परिशिष्टें—यांत ग्रंथांत उध्दृत केलेलीं वाक्यें, परिभाषा व न्याय, महत्त्वाचे शब्द व त्यांचे अर्थ व विषयानुक्रमणी असून भूमिकेमध्ये त्यांनी पाणिनीपासून अद्ययावत् पंडितांचा अल्प परिचय दिला आहे. त्यांत पाणिनि, कात्यायन, पतंजलि, भर्तृहरि, कैयट, भट्टोजीदीक्षित व नागेशभट्ट यांच्याबद्दलची माहिती पुढे त्या त्या कालखंडांत विस्ताराने दिली आहे. परंतु एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील पंडितांचा परिचय थोडक्यांत दिला आहे. यामध्ये वैद्यनाथशास्त्री पायगुंडे, भैरवमिश्र, नीळकंठशास्त्री थत्ते, मोरशास्त्री साठे, राघवाचार्य गजेंद्रगडकर, भास्करशास्त्री अभ्यंकर, काशिनाथशास्त्री अष्टपुत्रे, बालसरस्वती, म. म. गंगाधरशास्त्री तेलंग, विष्णुशास्त्री भट, रामशास्त्री गोडबोले इत्यादि विद्वान असून पाश्चात्य विद्वानांत डेक्कन कॉलेजमध्ये प्राध्यापक असलेले डॉ. किलहॉर्न यांचा परिचय प्रामुख्याने दिला आहे. आधुनिक विद्वानांत डॉ. भांडारकरांची कामगिरी विस्ताराने दिली आहे.

नंतर प्रस्तावनेंत शास्त्रीबोवांनी लिहून ठेवलेलीं सहा प्रकारचीं सूत्रें सोदाहरण दिलीं आहेत. पाणिनीच्या सूत्रांचे हे सहा प्रकार पुढीलप्रमाणे आहेत.—१ अधिकारसूत्रें; २ अतिदेशसूत्रें; ३ विधिसूत्रें; ४ अपवादसूत्रें; ५ नियमसूत्रें व ६ निषेधसूत्रें. या सूत्रांचें व्याकरणशास्त्रांत कोणतें कार्य असतें हें उदाहरणें देऊन स्पष्ट केलें आहे. पाणिनीच्या सूत्रांतील लाघवाचें वैशिष्ट्य सांगून त्यांचें निरपवाद प्रामाण्य 'न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निर्वर्तयन्ति' असें लिहून पतंजलीने कसें मान्य केलें आहे हें स्पष्ट केलें आहे.

शास्त्रीबोवांनी केलेलें भाषांतर अपूर्व आहे असें म्हणण्याचें कारण की आजपावेतों जगांतील कोणत्याहि भाषेंत ह्याचा अनुवाद झाला नाही. कारण हें काम सोपें नाही. तें सामान्य माणसाच्या आटोक्यापलीकडचें आहे. नाही म्हणावयास डॉ. किलहॉर्नने प्रारंभीच्या दोन आह्निकांचें इंग्रजींत भाषांतर केल्याचें ऐकतों व अलीकडे प्रा. क्षितीशचंद्र चट्टोपाध्याय, कलकत्ता, व अन्नमलायी विद्यापीठाचे प्रा. विद्यारत्न सुब्रह्मण्यशास्त्री यांनी इंग्रजींत भाषांतर करण्यास आरंभ केला आहे.

यानंतर उपोद्घाताला सुरवात झाली आहे. प्रारंभीच एक विद्वद्वंशवृक्ष इ. स. १५०० पासून तों १९५० पावेतों दिला आहे. त्यावरून महाराष्ट्रांत तरी ही विद्वत्परंपरा अखंड चालूं आहे असें दिसून येईल. पण ती पुढे खंडित होणार की काय अशी भीति वाटूं लागली आहे. कारण गजेंद्रगडकर, गोडबोले, अभ्यंकर, साठे, घाटे, घुले, भट, आगाशे वगैरे जीं नामांकित घराणीं सातारा, पुणें, इंदूर, धार, ग्वाल्हेर, नागपूर, सांगली, राजापूर, कोल्हापूर वगैरे ठिकाणीं आहेत त्यांची परंपरा या पिढीपासून थांबली असून पुढील पिढी आंग्लविद्याविभूषित होऊन वेगवेगळ्या प्रांतांत उच्चपदस्थ आहे. हा विद्वत्तेचा वारसा जरी त्यांना आनुवांशिक मिळाला असला तरी तिचा प्रवाह दुसऱ्या क्षेत्रांत वाहूं लागला! आमच्या पिढीला निदान प्रस्तुत लेखकासकट गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांच्या चरणाजवळ बसून पाठ घेण्याची संधि मिळाली होती हेंच आम्ही आमचें भाग्य समजतों! असो.

प्रो. अभ्यंकरांनी ऐतिहासिक चिकित्सेसाठी व्याकरणविषयक प्रगतीचे नऊ खंड कल्पिले आहेत. त्यांचें वैशिष्ट्य सांगून प्रत्येक कालखंडांत कसकशी प्रगति होत गेली तें सविस्तर वर्णिलें आहे. माझ्या मतें हा भाग या ग्रंथाचा मुख्य गाभा आहे. ते कालखंड खालीं दिल्याप्रमाणे आहेतः—

(१) प्रातिशाख्य अथवा पार्षदकाल (इ. स. पू. १४०० ते इ. स. पू. ६५०)
(२) पाणिनिकाल (इ. स. पू. ६५० ते इ. स. पू. ३००)
(३) वार्तिककाल (इ. स. पू. ३०० ते इ. स. पू. २००)
(४) पतंजलिकाल (इ. स. पू. २०० ते इ. स. ५००)
(५) भर्तृहरिकाल (इ. स. ५०० ते इ. स. ६५०)
(६) काशिकाकाल (इ. स. ६५० ते इ. स. १०००)
(७) कैयटकाल (इ. स. १००० ते इ. स. १४००)
(८) भट्टोजीदीक्षितकाल (इ. स. १४०० ते इ. स. १६५०)
(९) नागोजीभट्टकाल (इ. स. १६५० ते इ. स. १९५०)

हीं कालखंडांचीं नांवें व त्यापुढे दिलेला काल मोठा सूचक आहे.

प्रथमतः वेदांग कालीं म्हणजे प्रातिशाख्य-कालीं यांत वेदशाखांचीं प्रातिशाख्यें, यास्काचें निरुक्त, निघंटुकोश वगैरे येतात—व्याकरण विद्या या स्वरूपांत व्याकरण होतें. पाणिनि—कात्यायन—पतंजलि या मुनित्रयाच्या कालीं तें व्याकरणशास्त्र झालें. त्यानंतर भर्तृहरीच्या कालांत तें व्याकरणदर्शन म्हणून परिणत झालें. त्यानंतर काशिकाकार, कैयट व भट्टोजीदीक्षित यांच्या वेळीं तें भरभराटीस आलें. व नागेशभट्टांच्या कालांत तें शिखराला पोचलें.

कांही वाद :—या कालखंडाचें विवेचन करीत असतां प्रो. अभ्यंकर यांनी स्वतःचे जे सिद्धांत किंवा निष्कर्ष म्हणून मांडले आहेत ते सर्वस्वीं ग्राह्य होतीलच असें नाही व तसा त्यांचा आग्रहहि नाही. उदाहरणार्थ, संस्कृत भाषा व प्राकृत भाषा यांचा संबंध. वैदिक भाषेपासून प्राकृत भाषा झाल्या असें जें विधान पाश्चात्य भाषाशास्त्रज्ञ करितात त्याच्याशीं प्रो. अभ्यंकर सहमत आहेत. त्याबरोबरच 'प्रकृतिः संस्कृतम्' हें हेमचंद्राचें विधान व प्राकृत भाषेच्या टीकाव्याकरणकारांनी व टीकाकारांनी म्हटल्याप्रमाणे संस्कृत हीच प्राकृत भाषांची जननी आहे असें मानलें तरीहि चालेल असेंहि ते म्हणतात. या दोहोंचा समन्वय 'संस्कृत भाषा म्हणजेच वैदिक भाषा' असें म्हणून ते करितात. याप्रमाणे यांत अनेक 'वाद' म्हणून

आहेत. माहेश्वरी सूत्रांचें कर्तृत्व कोणाकडे, योगसूत्रकार पतंजलि व महाभाष्यकार पतंजलि हे एक की दोन, शब्दांच्या जाती व त्यांचें द्रव्य, गुण व जाति याप्रमाणे वर्गीकरण, उपसर्ग व निपात हीं प्रातिपदिकें आहेत की सुबन्तेंहि आहेत व त्याचप्रमाणे तीं द्योतक आहेत की वाचक आहेत, व त्यांना स्वतःचा अर्थ आहे की नाही, शब्द नित्य की अनित्य, शब्दाचा अर्थ 'जाति' की 'व्यक्ति', गुणवचन व द्रव्यवचन यांतील भेद, ध्वनि व स्फोट यांतील भेद, शब्दार्थाचें स्वाभाविकत्व व कृत्रिमत्व हे व इतर कांही वाद मूळ व्याकरणविषयक नसले तरी त्याच्या अनुषंगाने उद्भूत होतात. त्यांतील मुख्य म्हणजे कालनिर्णय. नंतर प्रक्षिप्त भाग हाहि वादाचा विषय आहे. कात्यायनाचीं वार्तिकें कोणतीं व इतरांची कोणतीं? त्याचप्रमाणे 'वृहत् शब्दरत्नाचा' कर्ता कोण; 'गोनर्दीय म्हणजे पतंजलीच कशावरून' अथवा पाणिनि ज्यांचा 'प्राचाम्' असा उल्लेख करतो ते पूर्व दिशेकडील म्हणजे कोणत्या देशाच्या पूर्वेस? असे अनेक वाद यामध्ये आले आहेत.

१ प्रातिशाख्य काल : — वेदाच्या प्रत्येक शाखेचें किंवा अनेक शाखांचें मिळून एक अशीं प्रातिशाख्यें लिहिलीं गेलीं. त्यांपैकी फारच थोडीं आज उपलब्ध आहेत. या प्रातिशाख्यांवरून एवढेंच सिद्ध होतें की त्यावेळीं व्याकरणविद्या अस्तित्वांत होती. प्रातिशाख्यग्रंथांत वैदिक पदांचा मुख्यतः विचार केला असून पदांचे घटक वर्ण, अक्षरें, मात्रा, योग्य उच्चारण, उच्चार दोष, उदात्त व अनुदात्त स्वरांचे विचार या सर्वांचें विवेचन या ग्रंथांतून केलेलें आढळतें. प्रातिशाख्यांचा काल पाणिनीपूर्व असें साधारण मत आहे. पण गोल्डस्टुकरचें मत याविरुद्ध आहे.

२ पाणिनि काल :— यांत प्रथमतः पाणिनीच्या कालाचा व त्याच्या जन्मस्थानाचा विचार केला आहे. अंतर्गत व बाह्य पुराव्यावरून त्याचा काल इसवीसनापूर्वी पांच शतकें असला पाहिजे असें मत ग्रंथकाराने दिलें आहे तें चिंत्य आहे. 'इंद्रवरुणभवशर्वरुद्रमृडहिमारण्ययवयवनमातुलाचार्याणामानुक्' (४.१.४९) या पाणिनि-सूत्रांत 'यवन' शब्द आला आहे. 'यवन' म्हणजे 'आयोनियन्स' हें स्पष्ट आहे. तेव्हां अलेक्झांडरच्या स्वारीनंतर (इ. स. पू. ३२१) पाणिनि झाला असावा असें पाश्चात्य विद्वानांचें मत आहे. पण प्रो. अभ्यंकर यांनी तत्पूर्वीहि आयोनियन लोक व्यापारासाठी इकडे येत होते असें सांगून पाश्चात्यांचें मत अग्राह्य ठरविलें आहे. पाणिनीला 'शालातुरीय' म्हणतात. शालातुर—सलाउर—हलाउर व वर्णव्यत्ययाने 'लाहुर' असें रूप होत असल्याने पाणिनीचें जन्मस्थान लाहोर असें अनुमान काढलें आहे.

लिहिण्याची कला पाणिनिपूर्व कांही शतकें अस्तित्वांत असावी याबद्दल मतभेद नाही. त्याचप्रमाणे वेदकालीं ती माहिती नव्हती व मौखिक पाठानेच वेद कायम राहिले याविषयीहि मतभेद नाही तर प्रातिशाख्यकालीं ती अस्तित्वांत आली असावी. विद्वानांत याबद्दल मतभेद आहे. तसेंच 'भाषा' या अर्थी 'संस्कृत' शब्द पाणिनीच्या अथवा पतंजलीच्या ग्रंथांत कोठेंहि वापरलेला आढळून येत नाही. तो भाषा या अर्थी जुन्यांत जुना रामायण व भरताच्या नाट्यशास्त्रांत आळढतो. पाणिनीने कोणत्या भाषेचें व्याकरण लिहिलें असाहि प्रश्न विचारण्यांत येतो. त्याचें उत्तर असें की पाणिनीने वेदांचा संपूर्ण अभ्यास करून त्याच्या स्वतःच्या प्रांतांत व कालांत असलेल्या प्रचलित भाषेशीं तुलना करून वैदिक वाङ्मयामध्ये जे जे भिन्न प्रयोग आढळले ते 'छांदस' प्रयोग मानून दोन्ही भाषांत समान आढळणारे शब्द व प्रयोग यांचा समावेश करून आपला अष्टाध्यायी ग्रंथ लिहिला. पाणिनिपूर्व कालीं वेगवेगळ्या कालीं बोलल्या

जाणाऱ्या भाषांचीं व्याकरणें होतीं. त्यांपैकी कांहींचा उल्लेख पाणिनीने आपल्या सूत्रांत केला हें मागे सांगितलेंच आहे. यांपैकी 'ऐंद्र' व्याकरण हें महत्त्वाचें होतें. आज जरी तें उपलब्ध नाही तरी त्यासंबंधीं अनेक ठिकाणीं उल्लेख आले आहेत. 'कातंत्र' नांवाचें दुसरें एक व्याकरण ऐंद्र व्याकरणाला मूलभूत धरूनच लिहिलें आहे. बौद्ध वाङ्मय या व्याकरणाला धरूनच लिहिलें आहे. हें सध्या महाराष्ट्रांत फारसें उपलब्ध नाही. डेक्कन कॉलेजांत किंवा भांडारकर प्राच्यविद्या-संशोधन मंदिरांत एखादी प्रत असल्यास न कळे. याशिवाय 'माहेश' (माहेश्वरी सूत्रें यानेच रचिलीं असावीं असें अनुमान आहे) व इतर व्याकरणांचा उल्लेख केला असून ग्रंथकाराने या सर्व व्याकरणांची पाणिनीच्या व्याकरणाशीं तुलना केली आहे. व्याडीचा 'संग्रह'ही याच वेळेचा असावा कारण तो पाणिनीचा समकालीन आहे.

पाणिनीला पूर्व व्याकरणकारांची मदत झालीच असली पाहिजे. त्याच्या व्याकरणाचें वैशिष्ट्य म्हणजे अनेक विषयांचें विवेचन करतांना त्याने शब्दांच्या बाह्य स्वरूपाकडेच विशेष लक्ष दिलें आहे. पाणिनीच्या मतें शब्द हे नित्य व अर्थाशींहि नित्यसंबद्ध असल्यामुळे त्याच्या अर्थाची चिकित्सा करण्याचें त्याला प्रयोजन वाटलें नसावें हें 'तदशिष्यं संज्ञाप्रमाणत्वात्' (१.२.५३) यावरून सिद्ध होतें.

यानंतर अष्टाध्यायींतील अध्यायवार विषयाची मांडणी कशी केली आहे तें सांगितलें आहे. आमच्या मतें त्यांत 'पाणिनिकालीं स्वरयुक्त उच्चारण' हें प्रकरण फार महत्त्वाचें व अगदी नवीन प्रकाश पाडणारें आहे. ग्रंथकाराच्या मतें पाणिनिकालीं वैदिक भाषेप्रमाणे लौकिक भाषेमध्येहि स्वरसहित उच्चारण होत असे. स्वरांमध्ये उदात्त हा मुख्य स्वर असून प्रत्येक शब्दांत एकच स्वर उदात्त असतो व बाकीचे अनुदात्त असतात. हा उदात्त स्वर इंग्रजींतील accent प्रमाणे आघातरूप असतो. कधीकधी मंत्रांचें उच्चारण स्वर म्हणजे एकश्रुति होत असे. ज्यांना शुद्ध स्वरसहित म्हणतां येत नाही त्यांनी तसें म्हणण्याच्या भानगडींत न पडतां स्वररहित एकश्रुतीने म्हणावें म्हणजे दोष लागणार नाही. सध्या वैदिक 'अग्निमीळे' मंत्र म्हणतांना जें स्वरोच्चारण करतात तें सदोष आहे असें ग्रंथकर्त्याचें स्पष्ट मत आहे. मग हें परंपरागत स्वरसहित म्हणजे सदोष कधीपासून झालें व याचा निकाल यापूर्वीच कसा झाला नाही हें एक गूढ वाटतें. पाणिनीने स्वरप्रक्रियेंत दिलेल्या नियमाप्रमाणे वेदांतील सर्व स्वर तपासून पाहणें व त्या नियमांप्रमाणे त्यांचा अर्थ बरोबर आहे की नाही पाहणें हें काम आजपावेतों कोणीहि केलें नाही. 'इंद्रशत्रु' या सामासिक शब्दाचा नीट स्वरोच्चार न झाल्याने कसा उलटा अर्थ झाला हें विश्रुतच आहे.

३ वार्तिककालः—या कालखंडाचें विवेचन करतांना अर्थातच कात्यायनाच्या वार्तिकांना प्रस्तावनाकाराने विशेष प्राधान्य दिलें आहे. भाषेमध्ये सारखे बदल होत असल्यामुळे वार्तिकें करावीं लागलीं. त्यांनी सूत्रांचें कांही ठिकाणीं स्पष्टीकरण केलें आहे तर कांही ठिकाणीं फेरबदल सुचविले आहेत. संपूर्ण वार्तिकपाठ कात्यायनाचा नसला तरी बहुसंख्य वार्तिकें कात्यायनाचींच आहेत असें डॉ. किलहॉर्नचें मत आहे. कात्यायनाने जेथे वार्तिकांची जोड देऊनहि शिष्टसंमत शब्द व प्रयोग साधण्यास अडचणी आल्या त्यांचें निवारण कांही लोकसिद्ध न्याय व कांही शास्त्रसंकेत स्वीकारून केलें. अशा न्यायांची संख्या चाळिसाच्यावर आहे.

४ पतंजालि अथवा महाभाष्य काल :—हा कालखंड या सर्व कालखंडांत महत्त्वाचा भाग आहे व त्याचें पूर्ण विवेचन केलें आहे. यांत महाभाष्याचें सर्व सार 'आह्निक'वार दिलें आहे. या विवेचनाने जवळजवळ १५० पृष्ठें व्यापिलीं आहेत यावरून त्याचा विस्तार लक्षांत येईल. मूळ भाषांतर वाचण्यास प्रारंभ करण्यापूर्वीं हा भाग वाचकाने आत्मसात् केला नाही तर हें भाषांतर मराठींत असूनहि समजणें कठीण जाईल.

महाभाष्य हें सूत्रें किंवा वार्तिकें याप्रमाणे लघुवचनसंग्रहाच्या स्वरूपाचें नाही. त्यांतील सिद्धांत हे शास्त्रोपयुक्त आहेत आणि प्रतिपादन व व्याख्यान शास्त्रीय पद्धतीने केलें आहे. परंपरेचा लोप झाल्यानंतर ज्याप्रमाणे बादरायण सूत्रांचा सूत्रकारांना अभिप्रेत अर्थ कोणता होता याबद्दल कांही ठिकाणीं संशय येऊं लागला त्याप्रमाणेच पाणिनीसूत्रांचेंहि झालें असतें. पण कात्यायनाने त्या सर्वांचें वार्तिकांनी टांचण केलें व नंतर भाष्यकारांनी तीं सर्व एकत्रित करून व त्यांत भर घालून आपला सुंदर प्रसादयुक्त ग्रंथ लिहिला.

पहिल्या पादाचीं नऊ आह्निकें असून त्यांत पहिल्या आह्निकाला 'पस्पशाह्निक' म्हणतात व तें अत्यंत महत्त्वाचें आहे. 'पस्पशा' हा शब्द 'स्पश्' 'ग्रहण करणें' या धातूपासून झाला असून त्याचा यौगिक अर्थ 'सूक्ष्म निरीक्षण' असा आहे. 'काव्येषु नाटकं रम्यम्' इत्यादि श्लोक जसा शाकुंतलाविषयी प्रसिद्ध आहे तद्वतच

शास्त्रेष्वाद्यं व्याकरणं मुख्यं तत्रापि पाणिनेः ।
रम्यं तत्र महाभाष्यं रम्या तत्रापि पस्पशा ।

हें येथे पूर्णपणें लागूं पडतें.

योगसूत्र, महाभाष्य व चरक संस्करण या तिन्ही ग्रंथांच्या एककर्तृत्वाविषयी सबळ पुरावा आहे. मॅक्समुलरला शंका येते ती ही की अशा (Heterogeneous) 'हेटराजीनीअस्' विसंगत विषयांचा कर्ता एक कसा असूं शकेल ? परंतु प्रतिभासंपन्नाला व गाढ विद्वत्ता असलेल्या पंडिताला हें कठीण नाही. जुन्या काळांत वाचस्पतिमिश्र, अभिनवगुप्त, माधवाचार्य, अप्पय्या दीक्षित, नागेश हीं तर उदाहरणें आहेतच; पण अगदी अर्वाचीन कालांत लोकमान्य टिळक व खुद्द म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर हीं विद्वद्रत्नें डोळ्यासमोर नाहीत काय ? यानंतर पतंजलीच्या वेळची परिस्थिति, ग्रंथसंपत्ति, धर्मसंप्रदाय, भौगोलिक परिस्थिति, संस्कृत भाषा व व्याकरण ग्रंथ या सर्वांचें विवेचन आहे. त्यांत बरीचशीं अनुमानें आहेत.

यानंतर अखेरीस भाष्यकारांचे व्याकरणविषयक मौलिक सिद्धांत देऊन त्यांचा ऊहापोह ग्रंथकाराने यथाशक्ति व यथामति केला आहे. हें करीत असतांना अनेक ग्रंथांतून उल्लेख दिले आहेत. यावरुन प्रो. काशिनाथपंतांचा व्याकरणविषयक सूक्ष्म अभ्यास दिसून येतो. वडिलांच्याजवळ जुन्या पौर्वात्य पद्धतीने व्याकरणशास्त्राचें मूलग्राही व पांक्त अध्ययन केल्यानंतर आंग्ल. भाषेचेंहि शेवटल्या पदवीपर्यंत शिक्षण घेऊन संस्कृतांत सर्व परीक्षेंत उच्च पद मिळविलें. या पाश्चात्य शिक्षणामुळे व नंतर कॉलेजांत अध्यापन केल्यामुळे त्यांचें ठिकाणीं चिकित्सात्मक 'नवी' दृष्टि आली. त्यामुळे हा सिद्धांताचा ऊहापोह त्यांनी फार समतोल बुद्धीने केला. आग्रह किंवा हट्ट धरला नाही. त्यामध्ये खालील विषय आले आहेत— शब्दनित्यत्वसिद्धांत, ध्वनि व स्फोट यांतील भेद, शब्दार्थप्रतिपादनाचें स्वाभाविकत्व, शब्दांचें अमर्यादित्व,

४

शब्दांचे प्रकार, शब्दांचें द्रव्याभिधायित्व, शब्दार्थाचे पोटभेद व त्यांचा बोधक्रम, शब्द-प्रयोगा-विषयी नियम, प्रत्ययांचा लोप झाला असतां होणारा अर्थबोध, क्रियावचन शब्द व भाव शब्दाचा अर्थ; शब्दांचे द्रव्यवचन, गुणवचन व क्रियावचन हे तीन प्रकार, उपसर्ग व निपात यांना द्रव्यवचन म्हणण्याच्या शक्यतेचा विचार, 'असत्त्व' शब्दाचा अर्थ, उपसर्ग व निपात यांचें वार्तिककारांनी प्रतिपादन केलेलें अनर्थकत्व, उपसर्गांच्या अर्थाविषयीं विचार, उपसर्गांचें अर्थद्योतकत्व; द्रव्यवचन, गुणवचन व क्रियावचन हे शब्दांचे तीन प्रकार, विशेषण शब्दाचें अभिधायिकत्व इत्यादि.

वर जवळजवळ वीस विषय दिले आहेत. यांचें विवरण सर्व महाभाष्यांत विखुरलेलें आहे. त्या सर्वांचें संकलन करून तें वाचकापुढे साधकबाधक प्रमाणें देऊन विशद केलें आहे. हें काम अत्यंत क्लिष्ट व रुक्ष आहे. पांडित्याची बैठक व सूक्ष्मबुद्धी असल्याशिवाय अशल्या तात्त्विक विषयांचें ग्रहण अशक्य आहे.

महाभाष्यासारखा उत्कृष्ट ग्रंथ लिहून झाल्यानंतर कित्येक वर्षें नव्हे तर कित्येक शतकें व्याकरणशास्त्रावर आणखी इतर ग्रंथ लिहिले न जाणें क्रमप्राप्तच होतें. मधल्या काळांत इतर शास्त्रांवर व दर्शनांवर भाष्यग्रंथ व टीकाग्रंथ झाले. त्यांचें स्वरूप धार्मिक असल्यामुळे लोकांची प्रवृत्ति त्या बाजूला अधिक वळली. बौद्ध धर्माची भरभराट होत होती. सामान्य लोकांसाठी चांद्र, कातंत्र, जैनेंद्र वगैरे व्याकरणें रचल्यामुळे पाणिनीय व्याकरणा-ध्ययनाकडे लोकांची प्रवृत्ति कमी कमी होऊं लागली. कालांतराने महाभाष्याध्ययनाचा लोप झाला. शंकराचार्यांनी बौद्ध मताचें खंडन करून वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें. त्याचा परिणाम असा झाला की बौद्ध मतानुयायी व्याकरणें मागे पडून पाणिनीय व्याकरणाचें व त्यावरील ग्रंथांचें पुनरुज्जीवन होऊन त्यांच्या अध्ययनास सुरुवात झाली. इतकेंच नव्हे तर भर्तृहरिसारख्या पंडितानेंहि महाभाष्यावर प्रकाश पाडणारा 'वाक्यपदीय' व त्यावरील 'महाभाष्यप्रदीपिका' टीका लिहिली.

५. भर्तृहरिकालः—पतंजलि व भर्तृहरि या दोहोंमध्ये बराच काळ गेल्याने मध्यं-तरीच्या काळांत कांहीं व्याकरणें झालीं. त्यांत चंद्रगोमींचें 'चांद्र', शर्ववर्म्याचें 'कालाप' व देवनंदीने केलेलें 'जैनेंद्र' हीं व्याकरणें मुख्य आहेत. शाकटायनाने लिहिलेलें 'शब्दानुशासन' आज उपलब्ध आहे. त्याचा संबंध पाणिनिपूर्व शाकटायनाशीं असला पाहिजे. भर्तृहरीने आपला त्रिकांडात्मक वाक्यपदीय ग्रंथ लिहून व्याकरणाला दर्शनाचें रूप दिलें. पुढे पाणिनींच्या मताला त्यामुळे दर्शनाचें स्वरूप आल्यामुळे 'सर्वदर्शन–संग्रहांत' त्याचें 'पाणिनिदर्शनम्' असा समावेश झाला.

सामान्य लोकांना शास्त्र आणि दर्शन या दोहोंमधील फरक कळत नाहीं. 'षड्दर्शनें' हा शब्द अनेक वेळा कानांवरून जातो, पण दर्शन शब्दाचा नेमका काय अर्थ आहे तो अज्ञातच असतो! शास्त्रामध्ये त्या शास्त्राचें केवळ तत्त्वज्ञान असतें पण तत्त्वज्ञानाची कास धरून मोक्ष-प्राप्ती अथवा आत्मसाक्षात्काराची प्राप्ती करून देण्यास मदत करणारे तें 'दर्शन' होय. सांख्य, वेदांत व योग हीं जशीं शास्त्रें असून मोक्षप्राप्तीचीं साधनेंहि आहेत तद्वत् व्याकरण हें शास्त्र असून मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें भर्तृहरीने आपल्या वाक्यपदीयाच्या पहिल्या कांडांत सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. शब्द–ब्रह्माची कल्पना करून ओंकार प्रणवांत तें कसें साठविलेले आहे याबद्दलची त्यांत चर्चा केली आहे. व्याकरणरूपी मंदिर जरी पूर्वाचार्यांनी बांधलें होतें

तरी त्यांत शब्दब्रह्मरूपी मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचें काम भर्तृहरीने उत्तम प्रकारें केलें; व त्याबद्दल त्याला अभिमानही होता. एकदा राजदरबारांत भाष्याची स्तुती होऊन 'अहो भाष्यम्, अहो भाष्यम्' असे प्रशंसोद्गार निघाले. ते सहन न होऊन भर्तृहरीने 'अहो वयम्, अहो वयम्' असे उद्गार काढून 'मामदृष्ट्वा गतः स्वर्गमकृतार्थः पतंजलिः' असें थोडक्यांत मार्मिक उत्तर दिलें!

६. काशिकाकालः—या खंडास 'वृत्तिकालखंड' असेंहि म्हणतां येईल. 'काशिका हा सर्वमान्य वृत्तिग्रंथ जयादित्य व वामन यांनी मिळून लिहिला. अंतर्गत व बाह्य पुराव्यावरून 'काशिकेचा' काल इ. स. ६५० मानण्यास हरकत नाही. काशींत हा ग्रंथ लिहिला गेल्यामुळे याला 'काशिका' म्हणतात असा विद्वानांचा समज आहे. या ग्रंथानें पाणिनिसूत्रांचें, क्रमवार उदाहरणें देऊन स्पष्टीकरण केलें असल्यामुळे व्याकरणशास्त्रांत प्रवेश मिळण्यास त्याकाळीं हा फार उपयुक्त ठरला; बौद्धांच्या उत्कर्षाच्या कालांत चांद्र, जैनेंद्र व शाकटायन यांच्या व्याकरणांवरहि अनेक वृत्तिग्रंथ झाले; पण हे सगळे कालांतराने मागे पडले. पाणिनीय सूत्रांवर लिहिलेली काशिकावृत्ति ही खरें म्हटल्यास भट्टोजीदीक्षितांच्या अत्यंत सुलभ अशा 'सिद्धांतकौमुदी' ग्रंथामुळे मागे पडली.

७. कैयटकालः—या कालाला 'व्याख्यानकाल' असेंहि नांव देतां येण्यासारखें आहे. भर्तृहरीने महाभाष्य-प्रदीपिका ग्रंथ लिहून व्याकरणशास्त्राचें पुनरुज्जीवन करून त्याबरोबर महाभाष्याचेंहि केलें. मध्यंतरीं व्याकरणासारख्या नीरस व दुर्बोध ग्रंथापेक्षा मीमांसा, वेदांत वगैरे शास्त्रांतील तत्त्वज्ञानपर ग्रंथांकडे लोकांचा कल साहजिक असल्यामुळे कुमारिलभट्ट, शंकराचार्य, वाचस्पतिमिश्र वगैरे विद्वानांनी लिहिलेल्या ग्रंथांकडे लोकांची प्रवृत्ति होऊन व्याकरणाच्या अध्ययन—अध्यापनाकडे लोकांचें लक्ष लागलें नाहीं. पण बाराव्या शतकांत कैयटाने 'महाभाष्य प्रदीप' ग्रंथ लिहून पुनरुज्जीवनाचें काम केलें. या ग्रंथाने पाणिनिसंप्रदाय स्थिर केला. हा ग्रंथ नसता तर कित्येक ठिकाणीं महाभाष्य दुर्बोध राहिलें असतें. आज वैयाकरणांत भाष्यान्त अध्ययनाबरोबर प्रदीपाचेंहि अध्ययन करतात. महाभाष्याने भाषेवर प्रभुत्व मिळवितां येतें तर प्रदीपाने पूर्वोत्तरपक्षरूप पांडित्याला चांगलीच मदत होते. प्रदीपाला पुढे 'कैयट'च नांव पडलें. "'कैयटा'चें पठन केलें आहे का?" असें म्हणण्याचा प्रघात आहे. या प्रदीपावरहि पुढे दहाबारा टीका झाल्या. त्यांमध्ये नागेशांचा 'उद्योत' फार प्रसिद्ध आहे.

८. कौमुदीकाल अथवा भट्टोजीदीक्षितकालः— भट्टोजीदीक्षितांनी 'सिद्धांत कौमुदी' हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिला. त्यापूर्वी 'प्रक्रिया-कौमुदी' सारखे प्रक्रिया ग्रंथ झाले होते. प्रक्रियाकौमुदीचा प्रसार पंधराव्या व सोळाव्या शतकांत बराच झाला होता. भट्टोजींच्या कालनिर्णयाबाबतींत उलट सुलट मुद्दे बरेच आहेत. ग्रंथकाराच्या मतें तो १७ व्या शतकाच्या आरंभीं असावा. त्यांचें अध्ययन शेष घराण्यांतील कृष्णशेषापाशीं झालें. हे महाराष्ट्रीय ब्राह्मण होते. कांहींच्या मतें ते आंध्र होते. बहुजनसमाजास संस्कृत शिक्षण सुलभ व्हावें या हेतूनेच भट्टोजींनीं आपला ग्रंथ लिहिला. अलीकडल्या काळांत डॉ. भांडारकर यांनी पहिलीं दोन पुस्तकें लिहून संस्कृत विषयांत सुलभ प्रवेश होण्यास जशी मदत केली तीच कामगिरी त्या कालांत सिद्धांतकौमुदीने केली. यावर 'प्रौढ मनोरमा' नांवाची टीका त्यांनी स्वत: लिहिलेली आहे. तर भट्टोजींचे नातू हरि-दीक्षित यांनी 'शब्दरत्न' लघु व बृहत् अशा दोन्ही टीका 'मनोरमे'वर लिहिल्या. सिद्धांत-कौमुदीवर प्रसिद्ध टीकाग्रंथ नागेशभट्टांचा लघु

आणि बृहत् शब्देंदुशेखर हा प्रमाणभूत समजला जातो. भट्टोजींनी कौमुदीशिवाय महाभाष्या-वर 'शब्दकौस्तुभ' हा विवरणग्रंथ लिहिला असून इतर शास्त्रांवरहि त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

९. नागेशकाल :—हरि-दीक्षितांचे शिष्य नागेशभट्ट. हे मूळ तासगांवचे राहणारे. काळे उपनांवाचे देशस्थ ब्राह्मण. त्यांचें सर्व अध्ययन काशीस होऊन ते पुढे तेथेच राहिले. त्यांनी निरनिराळ्या शास्त्रांवर बारा शेखर व बारा उद्द्योत लिहिले अशी आख्यायिका आहे. नागेशभट्ट हे व्याकरणशास्त्रांत नवमतवादी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांचे प्रसिद्ध ग्रंथ शब्देंदुशेखर, परिभाषेंदुशेखर, महाभाष्यप्रदीपावर उद्द्योत हे व्याकरण-विषयावर महत्त्वाचे आहेत. एकट्या परिभाषेंदुशेखरावर २५ टीका उपलब्ध आहेत! त्यांत अगदी शेवटची शास्त्रीबोवांची 'तत्त्वादर्श' ही आहे.

यानंतर कांही ग्रंथ झाले पण मूळ विषयांत भर न घालतां कोळी जाळें विणतो त्याप्रमाणे एकावर दुसरा, दुसऱ्यावर तिसरा असे मजल्याइतके टीकाग्रंथ झाले. यांत मुळाचा पत्ताच लागेनासा होतो!

पाणिनीपासून आजपावेतों पाणिनीय व्याकरणावर शेकडो ग्रंथ झाले असतील पण त्यांत मुख्य—पाणिनीची 'अष्टाध्यायी'; कात्यायनाचीं 'वार्तिकें' (वार्तिकसंग्रह); पतंजलीचें 'महाभाष्य'; भर्तृहरीचा 'वाक्यपदीय'; जयादित्य-वामनांची 'काशिका'; कैयटाचा 'महाभाष्यप्रदीप'; भट्टोजीची 'सिद्धांत कौमुदी' व 'प्रौढ मनोरमा'; नागेशभट्टांचे 'शब्देंदु-शेखर', 'परिभाषेंदुशेखर' व 'उद्योत' हे होत.

हे एकादश ग्रंथ आज अत्यंत प्रमाणभूत मानले जातात. त्यांपैकी पहिलें मुनित्रय—पाणिनि—कात्यायन—पतंजलि —याला विशेष प्रामाण्य आहे.

हा व्याकरणसागर जसा विस्तृत आहे तसा तो खोलहि आहे. त्यांतून वर अकरा रत्नें उध्दृत केलीं आहेत. इतक्यांचा अभ्यास झाल्यास त्याला 'आचार्य' म्हणण्यास हरकत नाही. कै. म. म. वासुदेवशास्त्री हे केवळ 'आचार्य' नसून 'प्राचार्य' होते असेंच म्हणावें लागेल!

याविषयीं अजूनहि कार्याला जागा आहे असें ग्रंथकाराचें मत आहे व तें रास्त आहे. (१) पूर्वींच्या वैयाकरणांनी लिहिलेल्या ग्रंथांचें उत्तम संस्करण व संपादन करणें; (२) त्यावर निबंधात्मक व विवेचनात्मक ग्रंथ लिहिणें व (३) बोलभाषेमध्ये अभ्यासू लोकांकरिता उपयुक्त असे अनुवाद करणें.

कांही किरकोळ दोष

शेवटी जो 'प्रस्तावना' हा सातवा भाग आहे तो मुख्यत: प्रो. का. वा. अभ्यंकर यांचा आहे. हा जवळजवळ पांचशे पृष्ठांचा ग्रंथ फार बहुमोल आहे हें निःसंशय आहे. पण तो सर्व लिहून झाल्यानंतर प्रसिद्धीला दिलेला दिसत नाही. त्यामुळे कांही ठिकाणीं पुनरुक्ति झाली आहे. भूमिकेंतील बराचसा भाग त्या त्या कालखंडांत पुन्हा आलाच आहे. दुसरा दोष म्हणजे आख्यायिका व दंतकथा बऱ्याच आल्या आहेत. त्यांपैकी कांही दिल्या नसत्या तरी चाललें असतें. तिसरा म्हणजे ग्रंथांत आलेल्या विशेषनामांचीं अकार-विल्हेवार सूची द्यावयास पाहिजे होती. यांत व्यक्तींचीं नांवें, ग्रंथकार व त्यांच्या ग्रंथांचीं नांवें दिलीं असतीं तर वाच-काला फार मदत झाली असती.

परीक्षण बरेंच लांबलें व सामान्य वाचकाच्या दृष्टीनें त्यांत फार खोल न जातां मुख्य विषयांचेंच दिग्दर्शन केलें. कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनी ही एक मोठी राष्ट्रीय

कामगिरी केली आहे. आपल्या कार्याचा अवास्तव बोभाटा न करितां गीतेंत सांगितलेल्या अनासक्त कर्मयोगाचें बारा वर्षे आचरण करून त्यांनी हें काम तडीस नेलें याबद्दल त्यांचा यथार्थ गौरव करण्यास आमच्यापाशीं शब्द नाहीत. आज 'भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन मंदिरांत' महाभारताचें संशोधन अनेक शास्त्रीपंडितांचें साहाय्य घेऊन व लाखो रुपये खर्च होऊन अनेक वर्षे चाललें आहे. त्याकामाइतकें हें काम जरी मोठें दिसत नसलें तरी शास्त्रीबोवांनी तें एकाहातीं व एकटाकी विनामूल्य व तेंहि एक तप परिश्रम करून शेवटास नेलें याबद्दल त्यांना कितीहि धन्यवाद दिले तरी ते थोडेच आहेत ! त्याचप्रमाणे प्रो. काशिनाथपंत यांनी सुपुत्राला शोभेल अशीच पुढची कामगिरी केली आहे. अशा कठीण विषयावर जवळजवळ ५०० पृष्ठांची विद्वत्तापूर्ण प्रस्तावना वडिलांच्या पावलावर पाऊल ठेवून लिहिली व तीहि डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या स्वाधीन विनामूल्य केली. जुन्या पंडितांची परंपरा या पिढीपावेतों तरी खंडित झाली नाही हें जें मागे म्हटलें आहे त्याला हा पुरावाच नाही काय ?

डे. ए. सोसायटीने आजपावेतों महाराष्ट्रांत विद्यादान अमूप केलें. पण वरील ग्रंथांचें प्रकाशन करून एक पाऊल पुढे टाकलें आहे. त्यासाठीं तीस हजार रुपये खर्च करून जी योग्य धडाडी व त्याबरोबरच शास्त्रीबोवांबद्दल जो आदर दाखविला त्याबद्दल धन्यवाद देणें अवश्य आहे. आम्हांस आशा आहे की सोसायटी येथेच न थांबतां शास्त्रीबोवांचे इतर ग्रंथ–(उ. शांकरभाष्याचें मराठी भाषांतर–)दुर्मिळ झाले आहेत त्यांचेंहि प्रकाशन करील. या कामीं प्रो. अभ्यंकर मदतीला आहेतच असें समजून चालण्यास हरकत नाही.

---

## अस्मिता

शतधारांतुनि तुझें विलसतें
 इंद्रधनु स्वप्नासम सुंदर;
चैत्र दंवाचा मी असलों तरि
 अंतरिं माझ्या 'धनुचें अत्तर.

श्रावणमासीं तव वनराई
 पसरी भूवर वामन-पाऊल;
ग्रिष्मामधि अन् कडेकपारीं
 पिंपळपानाची मम चाहुल.

'मित्र' होऊनि तूं जगतांतिल
 कळ्या अमित अन् विविध फुलविसी;
निद्रित सारे असले तरीहि
 कुमुदिना खुलते पाहुनि मजसी.

—देवीदास बागूल.

# परीक्षणें

मऱ्हाटी संस्कृति : कांही समस्या :— ( लेखक : श्री. शं. वा. जोशी, आंतरभारती प्रकाशन, किं. पांच रुपये. )

'मऱ्हाटी संस्कृति' हें पुस्तक श्री. शं. वा. जोशी या कर्नाटकी लेखकांनी लिहिलें असून तें आंतरभारती प्रकाशनाचें पहिलें पुस्तक आहे. मऱ्हाटी संस्कृतीच्या नांवाखाली या पुस्तकांत कानडी संस्कृतीचे पवाडे ग्रंथकारास गावयाचे आहेत. त्याकरिता ग्रंथकाराने इतिहास व वस्तुस्थिति यांचा शक्य तेवढा विपर्यास केलेला आढळेल. जिज्ञासू वाचकांस त्यांत 'मराठी' असें कांहीच आढळणार नाहीं. तर क्षुद्र व दीनदुबळ्या आणि पोरक्या अशा मराठी भाषेचें संवर्धन कानडीने कसें केलें व तिचेंच जुनें नांव घेणारे लोक कसे आहेत याचा श्री. जोशी यांनी सांगितलेला हा अपूर्व, मनःकल्पित इतिहास आहे. कल्पनात्मकता नेहमीच मनोरंजक असते, या दृष्टीने कांहींचें मनरंजन या ग्रंथाने होईल हाहि लाभ कमी नाही. इंग्रजांच्या विशिष्ट राजकीय दृष्टिकोनांची छाप या पुस्तकावर अजून दिसते ही गोष्ट पुस्तक वाचून संपविल्यावर ध्यानांत येते. आपल्या भाषाभगिनीच्या एका कट्टया उपासकास मराठी भाषा कशी दिसते याचें चित्र या पुस्तकांत आहे. या पुस्तकाच्या नांवाविषयी पण वाचकांस असें वाटेल की पुस्तकाचें नांव "मऱ्हाटी संस्कृति" असें नसतें आणि तें "कानडी संस्कृतीचा मराठीवर परिणाम" असें असतें तर तें शोभून दिसलें असतें. असो.

या पुस्तकांतील कांही समस्या ग्रंथकाराच्या मतें अशा आहेत :— "महाराष्ट्र" देशाचें मूळनांव महाराष्ट्र असें नसून तें 'मऱ्हाट' "मरहाट" आहे; महाराष्ट्र हा शब्द प्राचीन नाही; 'माहाराष्ट्री' हें प्राकृत भाषेचें नांव जनपदवाचक नसून केवळ "भाषावाचक आहे; मऱ्हाट या शब्दाची व्युत्पत्ति ( 'मर्कट' या शब्दाप्रमाणे ) मर=झाड व हट ( =हटकार, गवळी ) अशी आहे; महाराष्ट्राच्या अस्तित्वाचा पुरावा सातव्या शतकापर्यंत आढळत नाही ! महाराष्ट्रीयांची पहिली वसाहत वऱ्हाडांत झाली; 'वऱ्हाट' ( =मऱ्हाट, व=म या न्यायानें ) देशाचे मूळ रहिवासी हटगार=गोपाळ [ मराठे ( ! ) पृ. २८ ] होते; मरहट्ट असें प्राचीन रूप प्राकृत ग्रंथांतून आढळतें तें ठीक नसून तें मऱ्हाट ( =वऱ्हाट ) असे असावें; स्थलनामांवरून असें दिसतें की वेदकालापूर्वी द्राविडीजन पत्ति ( जन ) म्हणून प्रसिद्ध असावेत व ते महाराष्ट्रांतच काय पण इतर प्रांतांतहि, उत्तरेस व पूर्वपश्चिमेसहि पसरलेले असावेत; महाराष्ट्रिक हा शब्द "मरहट्ट–मऱ्हाट" यापासून उत्पन्न झाला; मरहाट=झाडमंडळ; मरहट्ट हा शब्द कानडी आहे; यदु म्हणजे मराठे व तुर्वसु म्हणजे कानडी जन, यदु हेहि द्रविडवर्गीय ( ! ). "राष्ट्रीय" हे 'नाडव' या शब्दाचें भाषांतर होय; 'खानदेश' शब्दांतील 'खान' = कन्न ( कन्नड पृ. ७८ ); पत्ति=हट्टी; इंग्लिश व इतर परभाषेच्या ( मराठी व्याकरणाप्रमाणे "इंग्लिशच्या व इतर परभाषेच्या" असें हवें ) उच्चाराविषयी महाराष्ट्रीय तितकीशी आस्था बाळगीत नाहीत, परंतु परकीय भाषेतील उच्चारांचें जसेंच्या तसें अनुकरण करण्यांत कर्नाटकीय साऱ्या हिंदुस्तानांत प्रसिद्ध आहेत; कर्नाटकांत प्राकृत–मराठी अभ्यासिली जात होती; मराठीचें संवर्धन कर्नाटकांतच झालें; 'मोडी' हा शब्द मुळांत कानडी आहे; पूर्वी कर्नाटक–महाराष्ट्राचे संबंध

जिव्हाळ्याचे होते; महाराष्ट्रांतील देवदेवता कानडी (अर्थात्, द्राविडी=कानडी) आहेत; यतिपंथ हा अवैदिक असून गुरुमार्ग हा संन्यासमार्ग होय; रामदासांनीं वारकरी सांप्रदाया-विरुद्ध बंड उभारलें, इत्यादि, इत्यादि.

वर उल्लेखिलेल्या समस्या केवळ चांचणी म्हणूनच दिल्या आहेत. हीं अनुमानें महाराष्ट्रानें आदरपूर्वक स्वीकारावीं म्हणूनच की काय महाराष्ट्रीय व कानडी मंडळींच्या स्नेहभावनेचें प्रदर्शनहि पुस्तकांत आहे. थेट ज्ञानेश्वरकालापासून देवाला 'कानडे-कानडे' म्हणून गौरवतां गौरवतां आम्ही महाराष्ट्रीय स्वतःच 'कानडे' झालों असा लेखकाचा दावा आहे. या सर्व खटाटोपावरून या ग्रंथांत कानडी संस्कृतीचें पुण्याहवाचन करणें हा ग्रंथकाराचा हट्ट पदोपदीं वाचकांस दिसून येईल. परंतु हें सर्व ग्रंथकारास कसें करितां आलें हें पाहूं या.

या पुस्तकांतील प्रमेयांचा आधार कोणताहि पुरावा देणें हा नसून ग्रंथकारांच्या मतांचें प्रतिपादन हा आहे यांत नवल नाहीं. या पुस्तकांत ग्रंथकाराने दृढमूल ठरवलेलीं मतें प्रथम मांडून मग पुराव्याचा पाठलाग व ससेहोलपट झालेली दिसेल; हेंहि मोठें सोयीस्करपणें शास्त्राचा विचार न करतां केलेलें दिसेल. अतिव्याप्त विधानाचा एक नमुना पहा:—(पृ. १०२) "ज्ञानेश्वरीच्या भाषेवर कानडी भाषेची दाट छाया असल्याचें संशोधकांनी सप्रमाण सिद्ध केलेलें आहे" (ठळक छाप आमचा.) या विधानावरून वाचकांस सहजच असें वाटेल की ज्ञानेश्वरींतील निदान पन्नास टक्के शब्द कानडी आहेत. एरवीं 'दाट' या शब्दाला अर्थ उरणार नाही. हें संशोधन करणारे लेखक दोन प्रो.—जहागीरदार (BORI) व श्री. पटवर्धन (ज्ञानेश्वरदर्शन). ज्ञानेश्वरींतील कानडी शब्दांचा संग्रह २२–२३ शब्दांच्या-पलीकडे पटवर्धन यांस दाखवितां आला नाही. 'इंडेक्स व्हर्बोरम' प्रमाणे धरली तरी एकंदर ज्ञानेश्वरींतील शब्दसंख्या १२०३० इतकी आहे, तर भाव्यांच्या शब्दकोशांत ही संख्या १३५७० आहे. आतां या विधानाचा भरवंसा म्हणून कोण कसा धरणार बरें? अशा अतिव्याप्त विधानांची संख्या या ग्रंथांत भरपूर असून त्यांचें खंडन करण्यास या ग्रंथाच्या दसपट ग्रंथ लिहावा लागेल.

या ग्रंथाचा सर्व डोलारा कांहीं ठराविक संदर्भग्रंथांतील सामुग्रीवर आधारलेला आढळतो. ते ग्रंथ लिहून झाल्यास आज फार वर्षे झालेलीं असून त्यानंतर पुष्कळ संशोधन झालें आहे- "वेदिक इंडेक्स", "रिलीजन अँड फिलॉसॉफी ऑफ दि वेदाज्" "महाभारत इंडेक्स", इत्यादि ग्रंथ वाचकांना सहज स्मरतील. यांतील कांहीं डळमळीत मतावर आधारलेलें संशोधन आता उघडें पडलें आहे. उदा: कीथच्या वरील दुसऱ्या ग्रंथांत स्लेटरचें प्रमाण देऊन आत्म्याच्या देहांतराची कल्पना ही द्राविडी आहे असें प्रतिपादन आहे. ही स्लेटरची केवळ कल्पना आहे! त्याला कांहींएक आधार नाही हें स्लेटरचें पुस्तक वाचल्यावर कोणासहि कळेल! शीं कित्येक इतर मतेंहि विवाद्य आहेत हें आम्ही सांगावयास नको!!

श्री. जोशी यांना ऐतिहासिक पूर्वापरतेची फारशी मातब्बरी वाटत नसावी असें पुढील सहज दिसलेल्या उदाहरणावरून दिसून येईल. उदाहरणार्थः (पृ. ९५) विदर्भाचा उल्लेख ते हरिवंश या उत्तरकालीन ग्रंथावरून घेतात. पण या जनपदाचें नांव जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण (२·४४०), बृहदारण्यक (२·५२२, वैदर्भी कौण्डिण्य), ऐतरेय ब्राह्मण (७·३४·९ वैदर्भ–भीम) इत्यादि ठिकाणीं आढळतें. हे उल्लेख पूर्वकालीन आहेत याविषयी प्रत्यक्ष जोशींखेरीज इतरांचे दुमत होण्याचा संभव नाही. मग त्यावरील अनुमानें बरोबर म्हणून

कशीं मानतां येतील बरें ? " वऱ्हाड " चें विदर्भ असें स्थित्यंतर ( ? रूपांतर ) झालें असणेंहि असंभवनीय नाही. " ( भाषेंतील विध्यर्थी विधानेंहि लक्षांत घ्यावींत ) असें ते लिहितात (पृ.९५), याच पानावर याच्याहि उलट विधान ते करितात. येथे जनाचें नाव 'महाराष्ट्रीय' असें मान्य करतात. पण मागे पान२०वर पहा बरें! तेथे हें केवळ " भाषा" नाम आहे अशा त्यांचा आग्रह आहे. कोण ही विसंगति ! ! अशोकाच्या शिलालेखांत महाराष्ट्राचा उल्लेख नाही या त्यांच्या विधानाची संगति उपलब्ध इतिहासावरून लावतां येण्यासारखी नाही. महावंसो व तत्पूर्वीच्या दीपवंसो यांत तरी महाराष्ट्राचा उल्लेख आहे ना ! पण श्री. जोशी यांनी ' महाराष्ट्र ' या शब्दासंबंधीं आपले मत ' घट्ट ' धरून ठेवल्यावर बापडा इतिहास पुढें काय करणार ! महाराष्ट्राच्या पूर्वकालीन अस्तित्वाविषयी इतर विद्वानांच्या लिखाणास तें 'क्लृप्त्या' म्हणतात ( पृ. ३० ) यांतच वाचकाने काय तो बोध घ्यावा. श्री. जोशी यांना महाराष्ट्र हा शब्द ' महरट्ट ' असा न वाटतां " मरहट्ट " असा कां वाटतो तर ' झाडीमंडळ ' हा शब्द इ. स. च्या अकराव्या ( ? ) शतकांत त्यांना आढळतो; आणि झाडीमंडळ म्हणजे भाषांतरांत मरहट्ट ! 'झाडे'नांवाच्या मूळच्या रहिवाशांच्यावरून ' झाडीमंडळ ' हें नांव कां पडलें नाही याचे सबळ कारण ते देत नाहीत ( पृ. ५४ ). उलट वररुचीच्या प्राकृत व्याकरणात आढळणारे महरट्ट हें रूप त्याज्य कां तर श्री. जोशी यांना तसें वाटतें !! सर्वच महाराष्ट्र पूर्वी कर्नाटकी लोकांच्या वस्तीचा होता असें क्षणभर गृहीत धरलें तरीहि लेखकाला मराठी मंडळींच्या कांही स्वतंत्र विशेषांची अशा तऱ्हेनें वासलात लावतां येणार नाही असें वाटतें. आतां या पुस्तकांतील भाषाशास्त्राकडे जरा वळू या.

' हाला ' या मेघदूतांतील शब्दाचे त्यांनी केलेले हाल फार मजेदार आहेत. ' दुधावरून दारू ' या कल्पनेपर्यंत ह्या शब्दाचें अर्थांतर होत गेलें अशा त्यांचा कयास दिसतो. पण ही प्रगति ( ! ) कशी झाली याचें कोडें मात्र ते सोडवीत नाहीत. ' गौर ' शब्दाचा संस्कृत मूलार्थ त्यांनी ध्यानांत न घेतां पृ. १२१ वरचें भाषाशास्त्रीय विवेचन केलेलें आढळेल. गौर म्हणजे पिंवळा. हा अर्थ त्याना अमरकोषांत मिळता. संस्कृतमध्यें " कनकचंपकदामगौर" ( आपटे संस्कृतकोष, पृ. ४८६, Practical Sanskrit English Dictionary 1889) " गोरोचनाक्षेपनितांतगौर " ( कुमारसंभव ७·१७, रघु. ६·६५ ) इ. शब्दांत तसाच प्रयोग आहे. मराठींत कानडी धातू खरें पाहिलें तर फारच थोडे आहेत ! श्री. जोशी यांनी कांही निश्चित संख्यात्मक विधान केलें असतें तर त्याविषयी खोल विचार करितां आला असता. यासंबंधांत पृ. ११० वर ते लिहितात. " मराठी भाषा जन्मतेवेळीं तेथेच जवळपास कानडीहि प्रचलित होती असें म्हणणें अनिवार्य ठरतें." खरें पाहिले तर हा त्यांनी मोठा ( ! ) संशोधनात्मक दाखवलेला आशय भाषांमधील परस्पर देवाणघेवाणीसाठी आवश्यकच आहे असें नाही ! म्हणजे जन्मकाळीं भाषा जवळ जवळ असाव्यात असें नाही ! ! इंग्रजींतील लूट, लोटा, ब्रह्म, कर्म, इत्यादि ऋणासाठी ही परिस्थिति आवश्यकच आहे काय ? याचें उत्तर कोणीहि आमच्यासारखेंच देईल यांत शंका काय ? एवढें लांब कशाला ? मराठी भाषेंत येणाऱ्या अशा धातूंचें काय ? श्री. जोशी यांची विधानें संशोधनाच्या डौलांत कशी पोकळपणाने केलेलीं असतात याची साक्ष यावरून पटेल. 'ळ'काराविषयींचें त्यांचें विवेचन असेंच तर्कदुष्ट आहे. ऋग्वेदकालांत ' ळ ' होता हें त्यांना अमान्य तर नाही ना ? याविषयी लिहितांना त्यांच्या तर्कधार्ष्ट्याची पराकाष्ठा दिसेल ! ते म्हणतात की ज्ञानेश्वरांनी लकार सहेतुक वापरला !! ज्ञानेश्वरासारख्या समतेच्या प्रगाढ पुरस्कर्त्याला आंतरभारतीच्या अभिमान्यांनी केलेला हा


अनुक्रमणिका

अहेर स्वप्नांतहि कोणी खरा धरणार नाही ! ज्ञानेश्वरांना कर्नाटक–महाराष्ट्र कलहाचे पुरस्कर्ते पूर्वज म्हणून श्री. जोशी समजत असतील तर न कळे । 'मराठीचें संवर्धन कर्नाटकांतच झालें.' (पृ. १०१) हा त्यांचा आग्रह असाच हास्यास्पद आहे. त्यांच्या पृष्ठ ९६ वरील " प्राकृत-रूपांचे मराठीकरणाचे प्रयोग सबंध कर्नाटकांत चालले होते " या भोंगळ मतास भाषाशास्त्र आणि ज्ञात भाषाविज्ञान यांत कवडीचाहि आधार मिळणार नाही ! मराठीच्या रूपांचीं तींच पूर्वकालीन रूपें होत हा आग्रही अट्टाहास शास्त्रीय नाही. कारण तशीं रूपें हिंदुस्थानांतील इतर भाषांतूनहि दिसतात. 'तूप' शब्द ऋग्वेदांत 'तृप' (८·२५) म्हणून येऊन त्याचें प्राकृत रूप "तुप्प" असें होतें हें आता उघड झाल्याने या शब्दावरचा परभाषीय बुरखा किती विरविरीत आहे हें कोणी सांगावयास नको. " सर्वभाषाविशारद " म्हटल्याने एखादा मंत्री प्राकृतविशारद होईल किंवा म्हणून सर्व कर्नाटकांत प्राकृतमराठी अभ्यासिली जात होती असें विधान करणें तर्कदृष्ट्या फारसें सुसंबद्ध होणार नाही. शहाजी महाराजांनी विजय मिळाल्यावर कर्नाटकांत बंधुभावनेने त्यांचें स्वागत झालें. त्यामागचा हेतु ग्रंथकार म्हणतात तसाच असेल काय याविषयी मानवी स्वभावाचें ज्ञान असणारा मनुष्य ग्रंथकाराबरोबर सहमत होणें कठीण आहे. कै. वि. रा. शिंदे यांचें लेख एका काळीं जरी प्रमाण धरले गेले असले (व त्यांचा तत्कालीन प्रयत्न स्तुत्यच होता) तरी आज त्या लेखांतील निर्णय अबाधित नाहीत हें स्पष्टच आहे. 'मोडी' लिपीविषयी म्हणूनच त्यांनी केलेलीं विधानें प्रमाण धरितां येणार नाहीत. श्री. जोशी यांनी मात्र कांहीसा राजकारणाचा डाव खेळून या बाबतींत महाराष्ट्रांतील कांही वाचकांचें मत तरी आपल्या सारखें व्हावें असा धोरणी प्रयत्न केला आहे. पण म्हणूनच त्यांत सत्य आढळेलच असा आग्रह कोणीहि चाणाक्ष वाचक धरणार नाही. शिवाय श्री. जोशी यांनी पुरावा कांहीच मांडला नसून एका मताच्या जोडीस आणखी एक मत असा कांहीसा अप्रमाण व अशास्त्रीय प्रकार होतो. शास्त्राच्या प्रांतांत सत्य प्रस्थापित करण्यास पुरावा हवा. मताची मातब्बरी नाही. तेव्हां कानडी साहित्यिकांनी मराठी भाषा, लिपी इत्यादि वनविण्यास साहाय्य केलें हा श्री. जोशी यांच्या शोधांतील कोहिनूर होय ! महाभारताच्या मराठी रूपांतरविषयींचें त्यांचें मत तपासून पाहाण्याइतपत सामग्री मुंबई विद्यापीठाच्या एका विद्यार्थ्याने आपल्या प्रबंधरूपाने सिद्ध ठेवली आहे आणि विद्यापीठाच्या ग्रंथालयांत तो प्रबंध पाहून कोणासहि आपलें मत बनवितां येईल.

श्री.जोशी यांचा महाराष्ट्रशब्दकोष वा व्युत्पत्तिकोष यांवर भरंवसा असल्याने त्यांनी कित्येक शब्द– झोंप, शहाणपण, राहाणी, चौऱ्यांशी, गयार (ळ?), विटाळ, लावकरू, खेप इत्यादि कानडी म्हणून स्वीकारून आपला डोलारा उंच उभारलेला दिसतो. व्युत्पत्तिकोषकारांनी त्यांच्या व्युत्पत्तीवर काढलेल्या आक्षेपांचीं उत्तरें अजून दिलेलीं नाहीत. त्या कोषाच्या अशास्त्रीयतेवर शास्त्रीय मताचें शिक्कामोर्तब जाणकार भाषाशास्त्रज्ञ करीत नाहीत. महाराष्ट्रशब्दकोषास व्युत्पत्तिकोषकारांचे तथाकथित प्रामाण्य पण नाही आणि त्यांच्या कोषमंडळांत कोणी भाषाशास्त्रज्ञ होता असा गवगवा आम्ही अजून ऐकलाहि नाही. त्यामुळे या दोन कोषांवर आधारलेल्या मतांचा गंभीर विचार करण्याची जरूरीच नाही.

स्थलनामावरून श्री. जोशी यांना जो आधार मिळवायचा आहे तो मराठी भाषेच्या जन्मापूर्वीच्या आणि फार जुना म्हणून सर्व हिंदुस्थानास फारतर लागू

पडेल. पण त्यांच्या 'पट्टि'पासून 'हडि'पर्यंतच्या समीकरणांना मान्यता मिळणें अवघड आहे. पद्र, पाळें, पहुडणें इत्यादि भाषाशास्त्रीय अनुमानें याच वर्गांतलीं आहेत. 'राष्ट्र' हा शब्द संस्कृतमध्ये आलेलें 'हाट' या शब्दाचें रूपांतर ऋग्वेदपूर्वकालापासून येत आहे असें सप्रमाण सिद्ध केल्याविना त्यांच्या 'मरहाट' या शब्दांतील 'हाट' शब्दविषयक इन्द्रजाल सिद्ध होणार नाही. राजवाडे यांच्या 'राठ' शब्दावरील विचित्र सिद्धांतांस शास्त्रीय महत्त्व देण्यापूर्वी त्याविषयीं इतिहासदृष्ट्या अधिक पुरावा देणें आवश्यक आहे.

देवताविषयक विवेचनांतील त्यांनी वेदकालीन देवताशास्त्रांशीं घेतलेली झोंबी अनैतिहासिक ठरेल. विष्णूची उपासना शैवपरंपरेनंतरची आहे हा त्यांचा शोध (पृ. ४८) असाच आहे. अलीकडीलच केवळ नव्हे तर पूर्वीचें एतद्विषयक संशोधन त्यांचा पाठपुरावा करणार नाही हें मराठी वाचकांस डॉ. दांडेकर यांची देवताविषयक व्याख्यानें वाचल्यावर स्पष्ट समजेल. भक्तिपंथांविषयी पण युरोपीय पंतांचें त्यांचें अंधानुकरण टिकण्यासारखें नाही हें गेल्या ५।१० वर्षांतील प्रसिद्ध झालेल्या संशोधनाच्या वाचनाने समजण्यासारखें आहे. ऋग्वेदांतील भक्तिविषयक सिद्धांतांविषयी प्रो. ह. दा. वेलणकर यांच्या मताशीं आमचें मत जुळण्यासारखें नसलें तरी वेलणकरांनी आणलेला पुरावाहि या मताचा भ्रमनिरास करण्यास समर्थ ठरेल. ऋग्वेदकालीन भाषेची मोड समजणारा कोणीहि तज्ज्ञ किट्टेलच्या कन्नड शब्दकोषाच्या प्रस्तावनेंतील मतांशीं सहमत होण्याचा सुतरां संभव नाही. याविषयी नीर = नील या व अशा इतर तत्कालीन शब्दांविषयी भाषाशास्त्रज्ञांचे प्रयत्न श्री. जोशी यांनी जरूर नजरेखाली घालावेत म्हणजे त्यांचे कित्येक दुराग्रह नाहीसे होतील. आता किट्टेलवाक्य म्हणजे वेदवाक्य समजण्याचें कोणासहि प्रयोजन नाही. श्री. जोशी यांनी यांच्या जोडीला 'फ्रीक्वेन्सी' किंवा शब्दाच्या पुनरावर्तनाची कसोटी त्यांच्या कित्येक अनुमानास लावून पाहिली पाहिजे. त्याचप्रमाणे कन्नड भाषेंत येणाऱ्या संस्कृत तद्भवाविषयी पूर्ण शोध झाल्याखेरीज त्यांची कित्येक अनुमानें स्वीकारितां येण्यासारखीं नाहीत हे एम्. ए. च्या भाषाशास्त्रवर्गांतील एखादा विद्यार्थीहि सांगेल. रुद्र ही देवता अवैदिक आहे असें म्हणतांना त्यांनी ज्याचा आधार कांहीं ठिकाणीं घेतला आहे त्या डॉ. कीथच्या मताचा विसर पडलेला दिसतो. कीथ हा आर्यांचा पक्षपाती नाही. पुराणांच्या आधारावर वेदकालीन गोष्टींचें निर्णय निश्चित करणें घाईचें आहे. श्री. जोशी यांच्या विवेचनांतील हे दुवे म्हणूनच कच्चे आहेत. आर्बमानचा रुद्रविषयक सिद्धांत फोल आहे हें आम्ही श्री. जोशी यांना कळविण्याची परवानगी घेतों. प्रो. राजवाड्यांच्या ऋग्वेदकालीन शब्देतिहासावर भरंवसा ठेवणें असेंच कठीण आहे. मल्हारी–इन्द्र रुद्र-शिव-मल्ल-मल्हारी ही त्यांची अनुमानपरंपरा किंवा स्कंद–खंडोबा समीकरणाचा त्यांनी केलेला त्याग इत्यादि गोष्टींवरून देवताशास्त्रांत किती सावधगिरी बाळगणें आवश्यक आहे आणि त्यावरून निसरडीं अनुमानें काढणें कसें धोक्याचें आहे हें तौलनिक देवताशास्त्रांचे अभ्यासकच केवळ सांगूं शकतील. कै. चिं. वि. वैद्य यांच्या कोंबडी-सोंवळें समीकरणाची आठवण होणार नाही असा भरभक्कम पुरावा मत बनविण्यास दिला पाहिजे. आपल्याकडे ग्रहांवरून नांवें ठेवीत नाहीत हें त्यांचें मत "मंगळ्या–बुध्या" हीं नांवें माहीत असणारांना पटणार नाही. दत्ताच्या चित्रावर केलेलें भाष्य व त्यावरील अनुमानें मनोरंजक आहेत. परंतु तीं शास्त्रीय नाहीत. कुत्रा हा वेदकालीं उपयोगी पडणारा प्राणी म्हणून मानला आहे हें ऋग्वेद २·३९·४ किंवा ७·५५·५ वरून आढळेल. एवढेंच नव्हे तर शंभर कुत्रे दान केल्याचा उल्लेख एका दानस्तुतींत आहे. रुद्र हा एकच श्वपति नव्हे. गाईसंबंधांत त्यांनी काढलेल्या अनुमानाविरुद्ध अनुमानेंहि लीलेने

काढून दाखवितां येतील. चित्रावरून हवे ते निष्कर्ष काढून ते शास्त्रीय म्हणून मिरवणें फारच अनिष्ट आहे. दत्तात्रेय हा देव वैदिक वेदकालीन नसला तरी जाबालोपनिषदांत तो उल्लेखिलेला आहे. केवळ कुत्र्यांच्या आधारावर त्या देवाला अवैदिक म्हणजे वेदपंथबाह्य ठरवितां येणार नाही. पुन्हा दत्तात्रेयाने यज्ञक्रियांसहित वेदांचें पुनरुज्जीवन केलें व चातुर्वर्ण्याची पुनर्घटना केली हे पुराणांतील उल्लेखहि श्री. जोशी यांच्या मतांना विरोधी आहेत. पुराणज्ञ दत्ताला विष्णूचा अवतार धरतात हें– "अत्रेः पुत्रं महात्मानं शांतात्मानमकल्मषम् । दत्तात्रेयं तनुं विष्णोः पुराणज्ञाः प्रचक्षते ॥" ह्या व अशा उल्लेखावरून कोणासहि समजेल. दत्त हा यति होता म्हणावा तर त्याचे भोग पुराणांतून प्रसिद्ध आहेत. यति–मुनि–संन्यासी हें समीकरण सर्वत्र चालण्यासारखें नाही. वैदिक मुनि म्हणजे परिव्राजक होय. मनूने पितृ–देव–ऋषि ऋण फेडल्यावांचून संन्यासी होऊं नये असा आदेश दिलेला आहे. त्रैवर्णिकांना संन्यासहि घेतां येत होता ही गोष्ट श्री. जोशी यांनी या प्रकरणीं विचारांत घेतलेली नाही. प्रत्यक्ष शंकराचार्यांचे शिष्य सुरेश्वराचार्य, विदुरास पुरण्याचा आश्रमवासिकपर्वातील (२६.३३) उल्लेख, 'स्त्रीणां चैके' हें बौधायनाचें प्रसिद्ध सूत्र, पतंजलीने केलेला 'शंकरा' नांवाच्या परिव्राजिकेचा उल्लेख, बृहदारण्यकांतील मैत्रेयी, गुप्तकालीन शिलालेखांतील नृपतिपरिव्राजकांचे उल्लेख इत्यादि गोष्टी श्री. जोशी यांनी या प्रकरणीं लक्षांत घेऊन विवेचन करणें अगत्याचें होतें. वर सांगितलेले सर्व लोक शैव होते हा शोध अजून लागलेला नाही. वैखानस हे वैष्णव होते ही गोष्ट संस्कृतज्ञांना अज्ञात नाही. सर्वांत जुन्या धर्मसूत्रांतून चार आश्रमांचा उल्लेख आहे. (उदा. आपस्तंब २.९.२१.१); गौतम, मनु, वसिष्ठ सर्वच चार आश्रम सांगत असतांना श्री. जोशी यांनी मूळचे आश्रम तीनच होते असें म्हणावें हें सत्यास धरून होणार नाही; अनवधान ठरेल. वैदिक यतिपंथ व पुढच्या काळांतील संन्यास यांचा जोशी अभेद मानतात. पण शांकरदिग्जयांतील गोष्टींवर विश्वास ठेवणाऱ्यांची संख्या आतां फारच अल्प आहे ! ! गुरु हें दैवत मानणारा पंथ निरीश्वरवादी असावा असें मत श्री. जोशी यांनी ठोकून दिलें आहे ! 'उत्तिष्ठत जाग्रत, प्राप्य वरान् निबोधत' हें सांगणारें उपनिषद् निरीश्वरवादी आहे असें तर श्री. जोशी समजत नाहीत ना ! गुरु म्हणजे पिता, विद्यादाता या समजुतीची परंपरा फार जुनी आहे. गुरुचरित्रांतील गुरु म्हणजेच 'गुरु' असें समजण्याचें कारण नाही बौद्धधर्मांत जातींचें महत्त्व मानीत नसत हा शोध आम्हांस समजण्यासारखा नाही. प्रत्यक्ष बुद्धाला आपल्या जातीचा अभिमान वाटत असे. दक्षिणेंतल्या एका राजाला बुद्धाशीं संबंध जोडावासा वाटला तेव्हां त्याला दासीपुत्री देऊन त्याची फसगत कशी झाली याचा उलगडा जोशीबुवा करितील काय ? गुरुचरित्रांतल्या किंवा इतर भाकडकथांवर विश्वासून सांस्कृतिक इतिहास लिहितां येणार नाही. कोणताहि पंथ यतिपंथ = द्राविडी व म्हणून अवैदिक असें ठरविण्याची शक्कल ऐतिहासिक ठरणार नाही.

उपसंहाराच्या प्रकरणांत श्री. जोशी यांची खरी मळमळ व हीनगंड दृष्टीस पडतो. दर २००–२५० वर्षांनी मराठी लोकांनी आपली सीमा दक्षिणेकडे रेटली, कानडी (द्राविडी) मंडळींना संस्कृत ग्रंथांत तामस म्हटलें आहे, महाराष्ट्रांत गेलेलीं कानडी घराणीं मराठी होऊन कानडीला पारखीं झालीं, कर्नाटकीय ब्राह्मणांनी संस्कृत प्राकृताचें वर्चस्व मान्य करून कानडी ओवळी ठरवली, मराठी लोक मद्रासेतहि मोडकेंतोडकें पण मराठीच बोलतात इत्यादि जोशीबुवांच्या तक्रारी आहेत. यांतच श्री. जोशी यांना कोणाचें सांस्कृतिक वर्चस्व खपत नाही याचा उलगडा होतो. श्री. जोशी एकदमच महाराष्ट्रास चुचकारतात, महाराष्ट्रावर रागावतात व

लोभावतातहि ! त्यांचा खरा हेतु महाराष्ट्राचा तेजोभंग करण्याचा आहे. यासाठीच त्यांनी खोडसाळ प्रतिपादनाचा मनमुराद प्रपंच केलेला आहे. ऐतिहासिक अपलाप केला आहे ( यदु-तुर्वसु घराण्यांविषयी महामहोपाध्याय मिराशी यांनी निरास केलाच आहे ). असें नसेल तर त्यांनी पुढील प्रश्नांचीं सरळसरळ पण प्रामाणिक उत्तरें द्यावींत. कानडी भाषा मराठीपेक्षा जुनी नाही असें मराठी लोक म्हणतात काय ? मराठी मंडळींनी कानडी भाषेचें ऋण अमान्य केलें आहे काय ? सर्व हिंदुस्थानांत पूर्वकाळीं कदाचित् द्राविडी संस्कृति असेल हा सिद्धांत मराठी लोकांनी डावलला आहे काय ? असें जर नसेल तर हा सर्व भाषाशास्त्राभासमय अशास्त्रीय खटाटोप कशाला ? मराठीपेक्षां इतर भाषा जुन्या आहेत, महाराष्ट्र हा देशच नव्हता इत्यादि गोष्टी अट्टाहासाने, साग्रह आणि इतिहासविरुद्ध असतांनाहि मराठी मंडळींना पुनः पुन्हा सांगण्याचें प्रयोजन काय ? श्री. जोशी यांना सर्व लोक सांगतील की महाराष्ट्रांत संस्कृतीचे प्रामाणिक अभ्यासक आहेत; लोकप्रियता मिळवण्यासाठी वा राजकारण करण्यासाठी आम्ही लेखन करीत नाही. जोशीबुवांचें स्थान त्यांच्या कट्टर भाषाभिमानावर अवलंबून असलें तरी मराठींत मराठी लोकांवर लिहितांना त्याचा उपयोग काय ? महाराष्ट्रांत " निर्वीरमुर्वीतलम् " अशी स्थिति केव्हाच नव्हती व होणार नाही ! जोशीबुवांनीं भाषाशास्त्राच्या कांही सिद्धांतांतून काढलेले कुतर्क टिकण्यासारखे नाहीत हें सिद्ध करण्यास महाराष्ट्रांत पुष्कळ विद्वान सुदैवाने हयात आहेत. त्यांनी ही मोहिनी बाजूला सारावी; आपल्या अभिमानाच्या भाषेंत इतर भाषांचें ऋण किती याचा पडताळा घ्यावा, त्यांतील संस्कृत तद्भवावर संशोधनाची दृष्टि फिरवावी आणि मग या फंदांत पडावें. भलत्या गोष्टींच्या नादीं लागून सत्याच्या पानासाठी मृगजलामागे धावूं नये अशी आमची त्यांना नम्र सूचना आहे. भाषाशास्त्रीय इंद्रजाल क्षणिक टिकणारें आहे; सत्य हेंच शाश्वत आहे; तिकडे त्यांनी आपला मोर्चा फिरवावा ही विनंती.

— म. अ. करंदीकर

कांही संपादित काव्यसंग्रहः—

( १ ) काव्यवाहिनी — खंड पहिला } संपादक – प्रा. रा. श्री. जोग
( २ ) काव्यवाहिनी — खंड दुसरा } कुसुमाग्रज
प्रका. कॉंटिनेंटल, प्रकाशन, टिळकरोड, पुणें २. किंमत प्रत्येकी तीन रुपये.

( ३ ) सप्तसरिता — संपादिका – मालती किर्लोस्कर, प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, किंमत तीन रुपये.

( ४ ) रसधारा — संपा. प्रा. भ. श्री. पंडित, प्रका. व्हीनस प्रकाशन, पुणें २ किंमत तीन रुपये.

( ५ ) मराठी सुनीत — संपा. प्रा. वि. म. कुलकर्णी, व प्रा. मा. ग. बुद्धिसागर चित्रशाळा प्रकाशन, पुणें २. किं. २॥ रुपये.

गेल्या दोन तीन वर्षांत अर्वाचीन मराठी कवितेंतील वेगवेगळ्या कालखंडांतील प्रातिनिधिक काव्याचें आणि कवींचें दर्शन घडविणारे असे अनेक काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. मराठी काव्याचा अभ्यास करणाऱ्यास मराठी काव्यांतील निरनिराळ्या कालखंडांचीं व त्य कालखंडांतील विविध प्रवाहांची योग्य रीतीने माहिती व्हावी हाच या काव्यसंग्रहांच्या संपादना-

मार्गे मुख्य हेतु आहे. त्या दृष्टीने प्रा. रा. श्री. जोग व कुसुमाग्रज यांनी संपादिलेले काव्य-वाहिनी भाग १ व २ हे संग्रह, प्रा. म. श्री. पंडित यांनी संपादिलेला ' रसधारा ' हा संग्रह आणि प्रा. मालती किर्लोस्कर यांनी संपादिलेला ' सप्तसरिता ' हा संग्रह हे संग्रह महत्त्वाचे वाटतात. ' काव्यवाहिनी 'चें संपादन करतांना गेल्या साठ वर्षांतील मराठी कवितेचें रूपदर्शन तीन चार संग्रहांतून करून देण्याचें उद्दिष्ट संपादकांनी आपल्या डोळ्यासमोर ठेवलें आहे व त्यापैकी दोन संग्रह आज प्रसिद्धहि झाले आहेत. त्यांपैकी पहिल्या खंडांत केशवसुत व त्यांचे समकालीन यांच्या काव्याचा अंतर्भाव केला असून दुसऱ्या खंडांत गोविंदाग्रज व त्यांचे समकालीन कवि यांच्या काव्याचें दर्शन घडविलें आहे. अशा रीतीने या दोन खंडांतून १८८५ ते १९२० पर्यंतचा कालखंड संपादकांनी आपणांसमोर ठेवला आहे. या दोन्हीहि संग्रहांना अतिशय चिकित्सक व त्या त्या काळांतील काव्याच्या स्वरूपाचें यथायोग्य दर्शन घडविणारी प्रस्तावना लाभली आहे. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत अर्वाचीन कवितेचें स्वरूप अन्तर्बाह्य कसें बदललें यांची मीमांसा केली आहे. ती करतांना केशवसुतांपासून मराठी काव्याला कोणतें नवें वळण लागलें व तें लागण्यास केशवसुतांच्या काळची महाराष्ट्र समाजाची वैचारिक परिस्थिति कशी कारणीभूत झाली याची संपादकांनी केलेली चिकित्सा अत्यंत मूलगामी पद्धतीची व काव्याच्या अभ्यासकांस अतिशय उपयुक्त अशी आहे. दुसऱ्या खंडांतील प्रस्तावनेंत केशवसुतांचा संप्रदाय पुढे चालविणाऱ्या कवींच्या कार्याचें विवेचन करतांना केशवसुतांच्या संप्रदायाचीं वैशिष्ट्यें स्पष्ट करून सांगितलीं आहेत. त्याबरोबरच या काळांतील केशवसुतांच्या संप्रदायापेक्षा भिन्न संप्रदायांत पडणाऱ्या अशा बॅ. सावरकर, किंवा साधुदास अशा कांही कवींच्या काव्याचाहि विचार केलेला आहे. संग्रहाच्या शेवटीं थोडक्यांत करून दिलेला कविपरिचयहि उपयुक्त आहे. या दोन्ही संग्रहांतील कवितांची निवड चोखंदळपणें केली असल्याने त्या त्या काळांतील काव्यामधील प्रमुख विचार प्रवाह व भावनाप्रवाह यांचें स्पष्ट दर्शन घडतें. कवितांचा अनुक्रम करतांना त्या त्या विषयां-वरील निरनिराळ्या कवींच्या कविता एकत्र याव्या अशी व्यवस्था केली आहे. हा विषयानुक्रम साधल्यामुळे त्या त्या काळांतील विविध भावनांचें व विचारांचें दर्शन आपणांला एका ठिकाणीं घडतें.

' सप्तसरिता ' हा प्रा. मालती किर्लोस्कर यांनी संपादिलेला काव्यसंग्रह एका दृष्टीने ' काव्यवाहिनी ' ला पूरक असावा असें वाटतें. ' काव्यवाहिनी 'त एकाहि कवी-यित्रीचें दर्शन आपणाला घडत नाही. 'सप्तसरितें'त लक्ष्मीबाई टिळक, बहिणाबाई चौधरी, मनोरमाबाई रानडे, संजीवनी मराठे, इंदिरा संत, पद्मा गोळे व शांता शेळके या सात प्रमुख कवयित्रींच्या निवडक कवितांचा संग्रह करण्यांत आला आहे. या संग्रहाला मालतीबाई किर्लो-स्कर यांनी ' सरितादर्शन' या नांवाची ६६ पानी विस्तृत प्रस्तावना लिहिली असून तींत प्रत्येक कवयित्रीच्या काव्याचें अंतरंग रसिकतेने उलगडून दाखविलें आहे. प्रस्तावना थोडीशी लांब वाटत असली तरी रूक्ष व नीरस नाही. तींत मालतीबाईंच्या अभ्यासाबरोबरच त्यांच्या अभिजात रसिकतेचा प्रत्यय येतो. मात्र कवितेची निवड चोखंदळपणानें केलेली असली तरी कवितांचा अनुक्रम विषयाप्रमाणे न लावतां कवयित्रीप्रमाणे लावला असतां तर अधिक बरें झालें असतें. ' सप्तसरितें'तील कालखंड फार मोठा आहे. त्या दृष्टीने प्रत्येक कवयित्रीच्या कविता एकत्र छापल्या असल्या तर काव्याच्या विकासाचीहि आपणांला कल्पना आली असती. प्रस्ताव-नेंतील त्यांचें विवेचन कवयित्रींप्रमाणे झालें आहे व कवितांचा अनुक्रम मात्र विषयवारीने लावला आहे. शिवाय ' सात ' या आकड्यावर संतुष्ट न होतां विमलाबाई देशपांडे, मनो-

रमाबाई नावलेकर किंवा अपर्णा देशपांडे अशासारख्या कवयित्रींच्या कवितांचा अंतर्भाव त्यांनी या संग्रहांत केला असता तर त्याला अधिक प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झालें असतें. याहि संग्रहाला कवयित्री–परिचयाची जोड शेवटीं मिळालेली आहे.

प्रा. भ. श्री. पंडित यांनी संपादिलेया 'रसधारा' या काव्यसंग्रहाचें स्वरूप यापेक्षा थोडें निराळें आहे. १८९० ते १९२० हाच कालखंड त्यांनीं या संग्रहासाठीं निवडला आहे व केशवसुतांपासून तो बालकवीपर्यंत बारा कवींच्या निवडक कवनांचा यांत त्यांनी समावेश केलेला आहे. हा कालखंड फार मोठा असल्यामुळे त्यांत अनंततनय, नागेश, कवि गोविंद यांसारखे कांहीं कवि येऊं शकले नाहीत तर बारा कवींच्या थोड्याच कविता स्थलमर्यादेमुळे निवडतां आल्यामुळे त्या त्या कवीची यथार्थपणें ओळख पटविणाऱ्या कांहीं चांगल्या कवितांचा अन्तर्भाव त्यांत करतां आला नाहीं. तथापि साधारणपणें कोणत्याहि प्रातिनिधिक संग्रहांत हा दोष अपरिहार्यपणें थोड्याफार प्रमाणांत डोकावतोच. या कालखंडांतील ज्या बारा कवींच्या काव्याचें दर्शन या संग्रहांत घडविलें आहे ते कवि व त्या कविता सर्वसाधारणपणें प्रातिनिधिक आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. सर्वसाधारणपणें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं बॅ. सावरकर किंवा कवि गोविंद यांच्यासारखा राष्ट्रीय वृत्तीचा आविष्कार ज्यांच्या कवनांतून झाला आहे अशा कवींचा अभाव ज्याप्रमाणें त्यांत जाणवतो त्याचप्रमाणे रे. टिळकांच्या 'ब्राह्मण किंवा महार' केशवसुतांच्या 'तुतारी' 'झपूर्झा' 'हरपलें श्रेय' विनायकांची 'महाराष्ट्रलक्ष्मी,' बी कवींची 'माझी कन्या' किंवा 'वेडगाणें' गोविंदाग्रजांची 'राजहंस माझा निजला' अशासारख्या उत्कृष्ट कवितांचा अभावहि त्यांत जाणवतो. हा थोडाफार वैयक्तिक अभिरुचीचा प्रश्न आहे यांत शंका नाहीं. त्यामुळें तो सोडून दिला तर या संग्रहांतील कवनांची निवड अतिशय रसिकतेने केली आहे असें म्हटल्यावाचून राहावत नाहीं. या संग्रहाला जोडलेली प्रस्तावना लहानशीच आहे पण तींत प्रा. पंडित यांची स्वतंत्र विचारसरणी व्यक्त झालेली आहे. विशेषतः 'केशवसुतांचा संप्रदाय' या विषयावर त्यांनी मांडलेले विचार अगदी निराळे व स्वतंत्र आहेत. "स्वतः त्यांनी एकाद्या विशिष्ट मतप्रणालीच्या प्रचारासाठीं असा एकादा संप्रदाय काढला होता असा इतिहासांत कुठेहि आधार नाहीं." हें त्यांचें विधान विचार करण्यासारखें आहे. संग्रहाच्या शेवटीं दिलेलें कविचरित्र, त्याच्या काव्याचा परिचय व प्रत्येक कवितेवरील विस्तृत टीपा हा या संग्रहाचा उल्लेखनीय विशेष आहे. काव्याच्या अभ्यासकास त्यामुळे हा संग्रह खासच उपयुक्त वाटेल.

प्रातिनिधिक कवींच्या काव्यसंग्रहाप्रमाणेच एकाद्या विशिष्ट काव्यप्रकाराचा प्रातिनिधिक संग्रह काढण्याचा प्रयत्न 'मराठी सुनीत' या सुनीतसंग्रहाच्या द्वारें प्रा. मा. ग. बुद्धिसागर व डॉ. वि. म. कुलकर्णी या प्राध्यापकद्वयांनी केला आहे. केशवसुतांच्या काळापासून आजच्या काळापर्यंत मराठी सुनीताचा विकास कसा कसा होत गेला हें त्यांनी कालानुक्रमानें प्रत्येक कालखंडांतील प्रमुख कवींचीं सुनीतें घेऊन दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. विषयदृष्ट्या व भावनादृष्ट्या या काव्यप्रकारांत केवढी तरी विविधता आली आहे हें या संग्रहांत निवडलेल्या ८४ सुनीतांच्या दर्शनाने सहज लक्षांत येतें. सुरवातीला जोडलेल्या प्रस्तावनेंतील पहिल्या भागांत सुनीताचा इंग्रजींतील इतिहास, त्याचें स्वरूप व त्याचें तंत्र याचा विचार केला आहे व दुसऱ्या भागांत मराठीमध्ये सुनीतरचनेचा झालेला प्रयत्न व त्या काव्यप्रकाराचा झालेला विकास याचा विचार केलेला आहे. ही प्रस्तावना अतिशय अभ्यासपूर्ण

रीतीनें लिहिलेली आहे व 'सुनीत' या काव्यप्रकाराचें एकंदर स्वरूप व मराठींत त्याचा झालेला विकास त्यामुळे चटकन् लक्षांत येतात.

ह्या पांचहि काव्यसंग्रहांनी मराठी कवितेच्या अभ्यासकांची चांगली सोय झाली आहे. विशेषत: प्रत्येक कवीचे काव्यसंग्रह संग्रहीं ठेवण्याची ऐपत नसणाऱ्या मराठी रसिकांना या संग्रहांचें खचितच स्वागत करावेसें वाटेल.

— म. ना. अदवंत

---

## मत्स्यगन्धा

कल्पने, ये—
मन माझें व्याकुळलें, आतुरलें,
तुजविण गऽ बावरलें.
पूर्वेच्या रंगांतुन,
हळूवारपणें रंगुन ये,
शुक्राच्या तेजानें न्हाउन ये,
पक्षांच्या पंखांतुन
जलद निळे अन्तराळ
वेधून ये, वेधून ये.
हिरव्या ह्या राओंतुन
पालवी तूं होउन ये
वाऱ्याच्या कंठांतुन
गीत तुझें घेऊन ये.
शुभ्र विरल मेघांचें
वस्त्र सखे लेऊन ये
चांदण्यांत मधुघट अन्
भरलेलें घेऊन ये.
नजरेचे शर सगळे
भुंवयांच्या धनुवरती
लावून ये, लावून ये—
लक्ष्य मीच होता मज
वेधून घे, वेधून घे.
शब्दजाल माझें हें
मीच सखे फेंकियलें
गुरफटलों त्यांत मीच
मासोळी तूंच दूरी.
मोहजाल टाकलेस
शन्तनु गे मी फसलों
त्यांतच गऽ गुंतलों
सोडव तूं मज आतां
होऊन गऽ मत्स्यगन्धा.

— शिरीष जोशी

अनुक्रमणिका

# मराठीचिये नगरीं —

संपादक

## कै. ह. ना. नेने

विदर्भ साहित्य संघाचे अध्यक्ष म्हणून निवडले गेल्याबद्दल दोन अंकांपूर्वी आम्हीं ज्यांचें उत्साहपूर्ण स्वागत केलें ते आमचे सन्मित्र श्री. हरिभाऊ नेने यांच्या आकस्मिक निधनाची वार्ता या ठिकाणीं नमूद करतांना आमच्या अंत: करणाला अत्यंत वेदना होत आहेत. ता, २२ नोव्हेंबर १९५४ रोजीं मोठ्या पहाटे निष्ठुर काळाने आपले पाश त्यांच्या गळ्याभोंवती अकस्मात् आवळले व त्यांना आमच्यांतून उचलून नेलें. ' अकस्मात् ' म्हणण्याचे कारण असें कीं दोनच दिवसांपूर्वी त्यांच्या आमच्या झालेल्या भेटींत असें कांहीं होण्याच्या संभवाची पुसट शंकासुद्धा मनांत निर्माण झाली नाही. त्यावेळीं श्री. हरिभाऊंना डॉक्टरांच्या घरून पायीं चालत येत असतांना आम्हीं पाहिले. अर्धापाऊण तास त्यांच्याशीं गप्पा गोष्टी केल्या, त्यानंतर ते स्वतः रिक्षांत बसून धंतोलींत फिरतांना आढळले...आणि दोनच दिवसांनी...
पण आता या आठवणींचा उपयोग काय? श्री. नेने दिवंगत झाले हें कठोर सत्य आहे. त्यामुळें मराठीची फार मोठी हानी झाली यांत शंका नाही. श्री. नेने हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे एक निष्ठावंत सेवक होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मध्यप्रांत शाखेचे तर ते अध्यक्षच होते. कांहीं दिवसांपूर्वी पत्रिकेसाठी मजकुराची उणीव ज्यावेळीं आम्हांला भासली त्यावेळीं शब्द टाकतांच ' विष्णुदास नाम्याचें द्रौपदी-स्वयंवर ' हा शोध-निबंध त्यांनी ज्या तत्परतेने लिहून दिला त्यावरून परिषदेवरील व पत्रिकेवरील त्यांचें प्रेम स्पष्ट होतें. श्री. नेने यांच्या संशोधनाचें मुख्य क्षेत्र ' महानुभाव वाङ्मय 'हें होतें. त्यांच्या मृत्युमुळे या क्षेत्राची कधीहि भरून न निघणारी हानी झाली आहे. हें लिहिणें नुसतें औपचारिक नाहीं. महानुभाव वाङ्मयाच्या क्षेत्रांत त्यांनी केलेली कामगिरी लक्षांत घेतली म्हणजे आमच्या या विधानाची यथार्थता कळूं शकेल. परिषदेने सकल्पिलेल्या वाङ्मयेतिहास योजनेंतील पहिल्या खंडासाठी महानुभाव वाङ्मयाचा जो इतिहास लिहावयाचा होता त्यासाठी श्री. बाळकृष्णशास्त्री आणि श्री. हरिभाऊ नेने यांना सहसंपादक म्हणून घेण्याचें ठरलें होतें. त्यापैकीं श्री. बाळकृष्णशास्त्री हे गेल्या वर्षीं दिवंगत झाले आणि आता श्री. हरिभाऊ नेने निघून गेले. त्यामुळे निर्माण झालेली पोकळी लक्षांत आणली म्हणजे यापुढे या कार्याला हात घालण्याचा विचार करणाऱ्या कोणाहि व्यक्तीचे हातपाय गळाल्यावांचून राहणार नाहीत...

...तें कांहींहि असलें तरी श्री. हरिभाऊंच्या निधनामुळे प्राचीन मराठी भाषेचा व वाङ्मयाचा एक निष्ठावंत अभ्यासक व संशोधक नाहीसा झाला यांत शंका नाही. व्यक्तिशः आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिकेतर्फे आम्ही आपली श्रद्धांजलि त्यांना अर्पण करतों.

## ग्वाल्हेर वाङ्मय परिषद

ग्वाल्हेर वाङ्मय परिषदेचें ९ वें अधिवेशन ग्वाल्हेर येथे ता. २०, २१ व २२ नोव्हेंबर १९५४ रोजीं साजरें झालें. श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी अध्यक्षस्थान मंडित केलें होतें.

अनुक्रमणिका





आपल्या भाषणांत त्यांनी प्रामुख्याने 'वाङ्मयांतील कांही अनिष्ट प्रवृत्तींविषयी' चर्चा केली. त्यांच्या विवेचनाचा आशय पुढीलप्रमाणें :

" जीवनांतील सौंदर्य हुडकून काढून तें वाङ्मयांत चित्रित करणें हा एक जुनाटपणा होय असें आज प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें आहे ! कारण वास्तव जीवन सुंदर नसून भयानक आहे. या भयानकतेला डोळ्याआड करून जर नुसतें 'मधुर कोमलकांत' असें कांही लिहूं लागलों तर तो जीवनाशीं अप्रामाणिकपणा होईल. म्हणून विकृति रंगविणें म्हणजेच खरें साहित्य होय असा एक भ्रम पसरून देण्यांत आला ! आपण पंचमहाभूतांकडे दैवी शक्ति म्हणून केवळ्या आदर आश्चर्याने पाहतों ! ही आश्चर्यभावना हा सौंदर्यवादाचा फार मोठा आधार होय. पण हा आधारच काढून घेण्याचा खटाटोप सुरू आहे. " सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च " असें भावभक्तीने अनेक शतकें उच्चारींत आलेल्या आम्हां आर्यांना पुढील ओळी वाचाव्या लागत आहेत —

आणि शेवटीं
ढगाआडच्या बावन खाणींत
पुनश्च जाईल छाकटा भास्कर

सागर हें निसर्गाचें केवढें भव्य स्फूर्तिदायक क्रीडित ! जगांतील महान् वाग्भटांना या निसर्ग-विलासाने स्फूर्ति दिली आहे. परंतु आमच्या 'नव कवि कुलगुरूं' नी त्या सागराला कसल्या कामाला जुंपलें आहे पाहा.

काढी सागराचा भंगी
घाण मात्र या कांठाला !

तुमच्या खोल मनांत युगानुयुगें प्रतिष्ठित होऊन बसलेल्या पवित्र कल्पनांवर हे विकृतिवादी महंमुदाची गदा मारीत आहेत. एवढ्यानेहि भागलें नाही. जगांतील दिव्यतेकडे यांनी विकृत दृष्टीने पाहिलें तर 'त्यांचें कर्म त्यांच्यापाशी' म्हणून रसिक स्वस्थ बसतील. पण पूर्वसूरींनी जी सौंदर्यनिर्मिति केली आणि वाङ्मयभक्तांना जी कायमची आनंदविषय होऊन राहिली तिची एक प्रकारें हेटाळणी व कुचाळकी केली जात आहे. ही निर्मिति करणारांची भूमिकाच चुकीची व पलायनवादी होती असें सूचित करण्यांत येत आहे !

" उघडि नयन रम्य निशा पुसत पुसत आली "
" डोळे हे फिल्मि गडे खोकुनि मज पाहूं नका "
" अजुनि चालतोचि वाट माल हा खपेना "

जगांतील वाङ्मयांतल्या कुठल्याहि रमणीय पंक्तीचे असें 'अतिवास्तववादी' विडंबन करतां येईल. याला कांही फार अक्कल लागते असें नाही. हें विडंबन मौजेसाठी केलेलें नसून नव्या तत्त्वज्ञानाचीं टेंकणें देऊन केलेलें आहे. म्हणून तर त्यांची भीषणता फार आहे. आपल्या पुस्तकांतल्या सुंदर स्त्रियांच्या चित्रांना दाढीमिशा काढणाऱ्या उपद्व्यापी पोरांची आठवण हे पाहून होते. पण हीं पोरें आपली चित्रेंच तेवढीं खराब करतात; पण हे नवे मूर्तिभंजक कवि सौंदर्याचीं चित्रें काढण्याची पद्धतीच चुकीची आहे असें आपल्या चेष्टितांनी सिद्ध करण्याच्या खटाटोपांत आहेत. "

" सौंदर्यवादाबरोबरच शाश्वततेवरहि अतिवास्तववाद्यानी तोफा डागल्या आहेत. जुने संकेत, उपमानें, प्रतीकें, प्रतिमानें इत्यादि सर्व जीर्ण झालीं आहेत अशी अवई उठवून नव्या उपमा–उत्प्रेक्षांची टाकसाळ सुरू झाली. यांतहि कांही बिघडलें नाही. नव कवींचेंच व नवकथाकारांचेंच हें वैशिष्ट्य आहे असेंहि म्हणतां येणार नाही. कारण कुठलाहि उत्तम लेखक स्वतःची प्रतिमासृष्टि निर्माण करीतच असतो. पण ज्या गोष्टी क्षणभंगुर किंवा दुर्मिळ आहेत त्यांचीं उपमानें केल्यास काव्याचें आवाहन स्थलकालांनी मर्यादित होत नाही का ?

त्रुटित जीवनीं सुटी कल्पना
ट्रिंग ट्रिंग जैसा खोटा नंबर

अगोदर टेलिफोन वापरणारे आमच्या देशांत किती टक्के लोक आहेत ? आज कांही बंगले-वाल्या लोकांखेरीज ही ' सुटी कल्पना ' कोणाच्या डोक्यांत शिरूं शकेल ! पुनः उद्या टेलिफोनच्या यंत्राचें तंत्र कांहीं वेगळेंच झालें की ही कल्पना संपुष्टांत येणार ! "

श्री. तळवलकरांनी नवकाव्यावर घेतलेल्या आक्षेपांचें स्वरूप नीट रीतीने लक्षांत यावें म्हणून हे लांब उतारे दिले आहेत. नवकाव्याच्या सर्वच आक्षेपकांना या विचारांशीं सहमत होतां येईल असे वाटत नाहीं. अशाश्वत नव्या प्रतिमानांवरील आक्षेप तर उघड उघड चुकीचा असून त्यावरील विवेचन वदतोव्याघातानें भरलेलें वाटतें. तथाकथित अतिवास्तववादी नव-कवींनी चालविलेल्या विडंबनाला जें ' नव्या तत्त्वज्ञानाचें टेकण ' दिलं आहे म्हणून श्री. तळवलकर म्हणतात तें स्पष्ट करून त्याचा पोकळपणा त्यांनी दाखविला असतां तर त्यांचें विवेचन पायाशुद्ध व परिणामकारक झालें असतें. " ही नवी अनुभूति नसून इलियटसारख्या आंग्लकवींनी चालविलेल्या नव्या प्रयोगांचें हें अंधानुकरण तर नव्हे ना ? ' हा त्यांना आलेला संशय या विवेचनानें दृढ झाला असतां असें आम्हांला वाटतें. या दृष्टीने तौलनिक प्रयत्न कोणीतरी अवश्य करून पाहावा अशी सूचना करणें अप्रस्तुत होणार नाही.

## महाराष्ट्र साहित्य सभा, इंदूर शारदोत्सव—

इंदूरच्या महाराष्ट्र साहित्य सभेकडून दरवर्षी शारदोत्सवाच्या निमित्ताने एक वार्षिक साहित्य संमेलन भरत असतें. यावर्षी सभेचा शारदोत्सव गेल्या डिसेंबर महिन्यांत अत्यंत यशस्वी रीतीनें साजरा झाला. सौ. कुसुमावती देशपांडे यांनीं अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. त्यांचें भाषण लहानसेंच पण अतिशय सुंदर झालें. रसिकाला वाङ्मयापासून आनंद कां व कसा होतो हा विषय जुना असला तरी त्याचें विश्लेषण त्यांनी मार्मिक रीतीने करून सांगितलें. ' वाङ्मयाचा आस्वाद हा अखेर एक व्यक्तिगत प्रकार असतो असें मला प्रथमपासूनच वाटत आलें आहे. त्याला एक समष्टिप्रधान बाजू आहे, सार्वजनिक स्वरूप आहे, त्याचा व्यक्तिनिर-पेक्ष निकष असूं शकतो. हें सर्व मला ठाऊक आहे. तें सार्वजनिक स्वरूप काय किंवा तो व्यक्तिनिरपेक्ष निकष काय याचा शोध घेण्याचेहि मी मधून मधून प्रयत्न केले आहेत. परंतु तो आस्वाद अखेर व्यक्तिमनाने घ्यावयाचा आहे; व्यक्तिमनालाच त्याचा खरेपणा, त्याची उत्कटता पटावयाची आहे; ती उत्कटता मोजण्यासाठी खरोखर आपणाजवळ कांहीहि साधन नाही हेंच पुनःपुन्हा प्रत्ययाला येतें आणि म्हणून पुन्हा एकदा नव्याने हेंच जाणवतें की अखेर वाङ्मयाचा आस्वाद कोणाला कसा मिळतो, कितपत उत्कटपणें मिळतो हे त्या त्या व्यक्तीच्या आंतरिक आवश्यकतेवर आणि पूर्वसंस्कारावर अवलंबून आहे ". अशा रीतीने विवेचनाला आरंभ करून रसिकाच्या व्यक्तिगत वृत्तीचीं वैशिष्ट्यें त्यांनी पुढीलप्रमाणे सांगितलीं

" ही जी मनाची वृत्तिसम्राज्ञी असते तिचे दोन विशेष सहज जाणवतात. ती मोठी चौकस असते. आपल्या भोवतालचें जग म्हणजे काय प्रकार आहे हे जाणून घेण्याची तिला तीव्र उत्कंठा असते. आणि अशीच आपण स्वतः म्हणजे तरी कोण आहोंत, कसे आहोंत हेंहि जाणून घेण्याची तिला आकांक्षा असते. हेच दोन्ही तिच्या व इतर व्यक्तिमनांच्या मधील स्पर्शबिंदू ठरतात. या विशेषांमुळेच अनत अंधाराच्या महासागरांत विखुरलेल्या या वेगवेगळ्या व्यक्तिमनांच्यामध्ये दळणवळणाचे मार्ग निर्माण होतात. एका मनाची हाक दुसऱ्याला पोचूं शकते. एका व्यक्तीची अनुभूति दुसऱ्या व्यक्तिमनांत संक्रांत होऊं शकते. मात्र हें संक्रमण स्वेच्छेने झालें, स्वयंनिर्णयाने झालें तरच होऊं शकते. कोणत्याहि एखाद्या अनुभूतीच्या स्वरानें आपणहून मनाचे कोट उघडले गेले तरच त्या अनुभूतीचा अंतरंगांत शिरकाव होतो, त्या अनुभूतीला तेथे मानाचें स्थान मिळतें. कधी कधी तेथेच रहिवासी होण्याचा हक्क मिळतो. ही खरी वाचनाची प्रक्रिया, वाङ्मयानंदाच्या निर्मितीची पद्धति' असें या वाङ्मयानंद-निर्मितीच्या पद्धतीचें वर्णन करून तिच्या साम्राज्याचें स्वरूप त्यांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केलें "हीच खरी साम्राज्यनिर्मिति. कारण येथे दुसऱ्याचें साम्राज्य हिरावून न घेतां, आपल्या साम्राज्याचा विकास होतो. नवनव्या प्रदेशांचा लाभ होतो व एकदा जें लाभलें त्याचा कधी नाश होत नाही. या अशा साम्राज्यवृद्धीमध्ये काळाचा अंतराय येत नाही, स्थळाचा येत नाही संस्कृतीचाहि येत नाही. स्थळकाळांतीत व संस्कृतिभेदातीत असें जें कांही जीवनामध्ये आहे किंवा बहुतेक असावें असें आपल्याला वाटतें, त्याचा साक्षात्कार या प्रक्रियेंत शक्य होतो." आणि तो कसा हें एका उदाहरणानें त्यांनीं अधिक स्पष्ट करून सांगितलें. रसिकांनीं हें संपूर्ण भाषण स्वतः वाचावें अशी आम्ही आग्रहाची सूचना करतों.

## दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन —

अनेक वर्षें बंद पडलेल्या दक्षिण-महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें यावर्षी पुनरुज्जीवन झालें ही आनंदाची गोष्ट आहे. त्याबद्दल कार्यकर्त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. संमेलन पुन्हा बंद पडणार नाही याची काळजी त्यांनी घेतली पाहिजे अशी सूचना केल्यास ती अप्रासंगिक म्हणतां येणार नाही. या संमेलनासाठी कार्यकर्त्यांना आचार्य अत्रे यांच्यासारखे नामांकित साहित्यसेवक व समाजसेवक कलावंत लाभले हें त्यांचें भाग्य समजलें पाहिजे. त्यांच्या अध्यक्षीय भाषणापेक्षाही समारोपाचें भाषण आम्हांला अधिक महत्त्वाचें वाटतें. " हीं संमेलनें केवळ १० टक्के लोकांपुरतींच सध्या मर्यादित आहेत. संमेलनाचे संदेश उरलेल्या ९० टक्के निरक्षर जनापर्यंत गेले पाहिजेत. तुकाराम, कबीर, एकनाथ यांनी ज्ञानाचें लोण खालच्या थरापर्यंत पोहोचविलें. जनतेंत मिसळून त्यांच्या हृदयांत आपण प्रवेश केला पाहिजे व त्यांच्या भावना आपण ओळखल्या पाहिजेत. अंधश्रद्धा व सामाजिक रूढी यांचा पगडा असल्यानें नवीन कल्पना आत्मसात् करण्यास अवधि लागतो. ह्य अंधश्रद्धा नष्ट झाल्याविना देश सधारणार नाही." असा जो संदेश त्यांनी आपल्या या समारोपाच्या भाषणांत दिला तो, सार्वजनिक रीतीने साहित्यसंस्थांचें कार्य करणाऱ्या सर्वांनी लक्षांत ठेवला पाहिजे. मराठी भाषा आणि साहित्य लोकाभिमुख करायचें म्हणजे काय करायचें असा प्रश्न मिस्किलपणें जे विचारतात त्यांना यापासून बराच बोध घेतां येईल एवढेंच येथे सुचवून ठेवतों.

---

## परिषद्‌वार्ता

( चिटणीसांकडून )

**संमेलन संदेश सभा:**—दिल्ली येथे आक्टोबरमध्ये भरलेल्या साहित्य संमेलनाचा वृत्तांत व संदेश सांगण्यासाठी शनिवार दि. १६ आक्टोबरला प्रकट सभा झाली. प्रा. श्री. म. माटे, श्री. शं. ना. जोशी, य. दि. पेंढरकर व सौ. पद्मा गोळे यांचीं भाषणें झालीं. श्री. न. वि. गाडगीळ सभेचे अध्यक्ष होते.

**कै. माधव ज्यूलियन–स्मृतिदिन:**—कै. माधव ज्यूलियन स्मृतिदिनानिमित्त दि. २९–११–५४ रोजीं श्री बा. रं. सुंठणकर यांचें 'आजच्या मराठी साहित्यांतील सामाजिक जाणीव ' या विषयावर व्याख्यान झालें.

**वार्षिक वाङ्मय समालोचनमाला:**—प्रतिवर्षीप्रमाणें प्रस्तुत मालेंत यंदा तीन विषयांवर वार्षिक वाङ्मय समालोचनपर व्याख्यानें झालीं. प्रा. ग. प्र. प्रधान (काव्य), प्रा. अ. ना. देशपांडे ( टीका ) व डॉ. अनंत फाटक (नभोवाणी वाङ्मय) यांची २–१२–५४, ३–१२–५४ व ५–१२–५४ रोजीं व्याख्यानें झालीं.

**भेटी व सत्कार:**— १–ग्वाल्हेर येथे नोव्हेंबरमध्ये भरलेल्या वाङ्मय परिषदेच्या अध्यक्षपदीं श्री. गोपीनाथ तळवलकर यांची निवड झाल्याबद्दल दि. १० नोव्हेंबरला त्यांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला. २–सुप्रसिद्ध आंग्ल कवि स्टीफन स्पेंडर यांनी ११ नोव्हेंबरला परिषदेस भेट दिली. पुण्यांतील निवडक साहित्यिकांशी त्यांनी वाङ्मयविषयक चर्चा केली. भारत सरकारच्या साहित्य अकादमीचे अंडर सेक्रेटरी श्री. प्रभाकर माचवे यांनी ६ जानेवारीला परिषदेस भेट दिली. अकादमीचें धोरण व कार्य यासंबंधी त्यांनी परिषदेच्या कार्यकर्त्यांशी चर्चा केली. त्यांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला.

**श्री. बेंद्रे यांची संत तुकारामविषयक चर्चा:**—सुप्रसिद्ध संशोधक श्री. वा. सी. बेंद्रे गेलीं कित्येक वर्षे तुकाराम वाङ्मयाचें संशोधन करीत आहेत. या संशोधनांतून निघालेल्या कांही प्रमेयांची चर्चा त्यांनी दि. २८ डिसेंबर रोजीं परिषदेंतील कार्यकर्त्यांशी केली. याप्रसंगीं प्रा. वि. वि. पटवर्धन, प्रा. य. र. आगाशे, प्रा. चिं. वि. जोशी, प्रा. पारसनीस, प्रा. केळकर, प्रा. जोग, प्रा. सौ. घुमटकर, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. श्री. म. माटे इत्यादि मंडळी उपस्थित होती.

**प्राज्ञ–विशारद वर्ग:**—दरवर्षीप्रमाणे यंदा प्राज्ञ व विशारद वर्ग जुलै ते डिसेंबर १५ पर्यंत चालू होते. यंदाच्या वर्गांत प्रा. श्री.म. माटे, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा.श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. रा. ना. गद्रे, डॉ. स. वि. सहस्रबुद्धे, प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. प्र. न. जोशी प्रा. य. र. आगाशे, श्री. प्र. शं. जोशी, श्री. ग. स. शुक्ल, श्री. गं. रा. पाठक श्री. द. के. बर्वे यांनी अध्यापनकार्य केलें.

**दुखवटा ठराव:**—मुंबई राज्याचे राज्यपाल कै. गिरिजाशंकर वाजपायी व सुप्रसिद्ध साहित्यिक कै. ह. ना. नेने यांच्या दुःखद निधनानिमित्त परिषदेतर्फे दोन ठराव संमत करण्यांत आले. ते असे:–१ मुंबई राज्याचे राज्यपाल गिरिजाशंकर वाजपायी हे आज पहाटे २।

अनुक्रमणिका

वाजतां निधन पावले या वार्तेने महाराष्ट्र साहित्य परिषदेस फार दुःख होत आहे. कै वाजपायी हे विद्याव्यासंगी—विशेषतः संस्कृत भाषेचा फार आवड असलेले एक गाढे विद्वान् होते. पुणे विद्यापीठाचे कुलपति या नात्याने त्यांनी केलेलें कार्य उल्लेखनीय असून राज्यशासनांतील त्यांचे नैपुण्य वाखाणण्याजोगें होतें कै. वाजपायी यांच्यासारख्या अनुभवी, जाणत्या राज्य-शास्त्रपंडिताची सांप्रतच्या काळांत फार मोठी आवश्यकता असल्यामुळे त्यांच्या निधनाने झालेली देशाची हानी भरून न निघणारी आहे. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत महाराष्ट्र साहित्य परिषद सहभागी आहे. ( ५–१२–५४ ) २ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मध्यप्रदेश शाखेचे अध्यक्ष व प्रसिद्ध साहित्यिक हरी नारायण नेने यांच्या २२–११–५४ रोजीं झालेल्या निधनाने म. सा. परिषदेस फार दुःख होत आहे. कै. नेने हे कर्तृत्ववान व उत्साही कार्य-कर्ते होते. विशेषतः महानुभाव वाङ्मयांत त्यांनी केलेलें संशोधनकार्य मराठी भाषेंत चिर-कालीन स्वरूपाचें असून त्या कार्यात त्यांच्याकडून अधिक कार्य होण्याची फार मोठी आशा परिषदेने बाळगली होती. कै. नेने हे या वर्षी विदर्भ साहित्य संघाचेही अध्यक्ष झाले होते. त्यांच्या निधनाने म. सा. परिषद व वि सा. संघ या संस्थाची मोठी हानी झाली आहे. म. सा. परिषद त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत सहभागी आहे. ( ३–१२–५४ ).

परीक्षकांना विनंती:—म. सा. परिषदेच्या परीक्षांसाठी ज्यांना परीक्षक होण्याची इच्छा असेल त्यांनी जुलै १९५५ पर्यंत अर्ज पाठवावेत. शिक्षण, अनुभव, व्यवसाय पदवी यांचा उल्लेख अर्जांत असावा. परीक्षक म्हणून ज्यांनी ३ वर्षे काम केलें आहे त्यांची सामान्यत परत नियुक्ति होत नाही.

---

# नवीन सभासद

तहहयात

१ श्री. ग. नि. काले, वेळगांव.

साधारण

१ श्री. स. ल. काल्ळकर, उंबरगांव ( ठाणें ).
२ श्री. प्र. पं. जोशी, पुणें २.
३ श्री. कां. खे. भंडारी, पुणें २.
४ सौ. शांताबाई भांडारकर, पुणें १.
५ श्री. गो. ब. माकोडे, इंदूर (म. भा.)
६ श्री. सि. पां. गोगटे, अजमेर ( राजपुताना )
७ श्री. गो. रा. आफळे, अजमेर ( राजपुताना ).
८ श्री. र. ल. काळे, अजमेर (राजपुताना)
९ डॉ. ना. गो. नांदापूरकर, हैद्राबाद(द.)
१० श्री. शिरी जोशी, ठाणें.
११ श्री. प्र. वा. कारखानीस, मुंबई.
१२ श्री. ह. के. बर्वे, पुणें २.
१३ प्रा. द. ल. गोखले, अमळनेर (पू. खा.)
१४ प्रा. विद्याधर पुंडलिक, पुणें २.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (मानभावअखेर)—
ले.— वा. अ. भिडे (प्रती शिल्लक नाहीत.)

२. महाराष्ट्र–साहित्य–परिषद्–इतिहास— ले. म. म. प्रा. द वा. पोतदार
मूल्य रु. ३, सभासदांस रु. १॥ (ट. ख. निराळा)

३. प्राचीन पद्यवेचे भाग १ व २ (प्राज्ञ-परीक्षेस लावलेलें)-मूल्य रु. २।=

४. वाङ्मयीन समालोचन (१९४७)—मूल्य रु. २, सभासदांस रु. १॥

५. शुद्धलेखन-नियम—मूल्य १॥ आणा (ट. ख, निराळा)

६. वाङ्मयीन वाद (परिषद्–पुरस्कृत)—मूल्य रु. ३, सभासदांस रु. २८=

७. संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति—ले. प्रा. गं. बा. सरदार,
मूल्य रु. २, सभासदांस रु. १॥ (ट. ख. निराळा)

८. साहित्यसुगंध (प्रवेशला लावलेलें)-मूल्य रु. २ (ट. ख. निराळा)